






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १९ वे ] डिसेंबर १९६५ [ अंक ३



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष एकोणिसावे

अंक तिसरा

# नवभारत

डिसेंबर

१९६७

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४






# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ८०.०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १०४.०० |
| (२) धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | १५०.०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १८२.०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५.०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ६३.०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०.०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ६ | | २३०.०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६.०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | | २०.०० |
| (८) हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) ... | | ५.०० |
| (९) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६.०० |
| (१०) नवमानवतावाद ... ... ... | | २.५० |
| (११) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३.०० |
| (१२) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) ... | | ३.०० |
| (१३) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | | २.५० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना (श्री. चा. अ. दाभोलकर) .... | | २.०० |

अनुक्रमणिका

श्री. पन्नालाल सुराणा

# चौथ्या योजनेचे भवितव्य

पुढील वर्षापासून ( १९६६–६७ ) चौथ्या योजनेच्या अमलबजावणीला सुरुवात होणार आहे. म्हणून चालू वर्षअखेर ( १९६५–६६ ) त्या योजनेचा मसुदा पक्का व्हायला पाहिजे होता. पण नियोजन मंडळाचे उपाध्यक्ष श्री. अशोक मेहता यांनी ता. ९ ऑक्टो. १९६५ रोजी जाहीर केले की चौथ्या योजनेचा मसुदा पुढील वर्षी प्रसिद्ध केला जाईल. वास्तविक तो मसुदा बनविण्याचे काम गेली तीन वर्षे चालले आहे. १९६५ च्या सप्टेंबरातील पाक–भारत युद्ध व त्यामुळे निर्माण झालेली परिस्थिती यामुळे मसुद्यात काही बदल करणे अपरिहार्य झाले असले तरी तो मसुदाच मुळी ५ सप्टेंबर १९६५ पर्यंत अंतिम स्वरूपात तयार झाला नव्हता ही चिंतनीय बाब आहे. ५-६ सप्टें. ला भरलेल्या राष्ट्रीय विकास मंडळाच्या बैठकीत चौथ्या योजनेच्या सर्वसाधारण स्वरूपाला मान्यता देण्यात येऊन त्यात आवश्यक ते बदल करण्याचे अधिकार पंतप्रधानांना देण्यात आले होते. गेल्या दोनतीन वर्षांतील अस्थिर आर्थिक परिस्थितीमुळे चौथ्या योजनेचे स्वरूप व व्याप यावर बराच वादविवाद सुरू झाला होता. अखेरचा निर्णय लवकर होऊ शकला नाही ही केवळ कारभारयंत्रणेतील उणीव नसून एकंदर आर्थिक विकासाच्या धोरणाविषयी एकमताचा अभाव व गोंधळ ही अधिक चिंताजनक बाब आहे. तसेच तिसऱ्या योजनेच्या परिपूर्तीतील भयानक उणीवांच्या पार्श्वभूमीमुळे चौथ्या योजनेच्या भवितव्याविषयी काळजी वाटू लागली आहे.

## संरक्षणप्रयत्नाची आर्थिक गरज

संरक्षणप्रयत्नात कराव्या लागणाऱ्या प्रचंड वाढीमुळे आर्थिक विकासाच्या प्रक्रियेवर अनिष्ट परिणाम होणार याची कल्पना १९६२ सालीच आली होती. १९६५ मधील पाक-भारत युद्धामुळे मूळ परिस्थितीत फार फरक पडण्याचे कारण नाही. १९४७ साली पाकिस्तानने काश्मीरवर आक्रमण केले तेव्हापासून देशाची संरक्षण तयारी पाकिस्तानपासूनच सर्वांत मोठा धोका आहे असे गृहीत धरून करण्यात येत होती. १९६२ साली चीनचे आक्रमण झाल्यानंतर संरक्षण प्रयत्नांची नवी परिसीमा ध्यानी आली. १९६२–६३ साली संरक्षणप्रयत्न काही अंशी वाढविण्यात आले. आणि सर्व बाजूंकडील धोका लक्षात घेऊन संरक्षणप्रयत्नांची एक पंचवार्षिक योजना १९६४ साली बनविण्यात आली. १९६४ ते ६९ या काळात त्या योजनेवर रु. ५,००० कोटी खर्च करण्याचे ठरविण्यात आले. लष्कराचे मनुष्यबळ, साधनसामग्री व ती उत्पादन करण्याची क्षमता यात भरीव वाढ करण्याचे उद्दिष्ट ठरविण्यात आले. १९६४–६५ या वर्षी संरक्षण पंचवार्षिक योजनेच्या अंमलबजावणीला चांगल्या प्रकारे सुरुवात झाली. १९६५ च्या पाक-भारत युद्धामुळे त्या योजनेत काही मूलगामी बदल करण्याचे कारण दिसत नाही, व शक्यताही दिसत नाही. कुठलीही योजना बनविताना गरज व शक्यता या दोन्हींचा समन्वय साधावा लागतो. स. १९६४–६९ संरक्षण योजनेत गरजेवर भरपूर भर दिला होता. दरवर्षी सरासरीने रु. १००० कोटी त्या योजनेवर खर्च करायला हवे होते. १९६३-६४ साली रु. ८१७ कोटी खर्च करण्याचे ठरले होते. पण प्रत्यक्षात खर्च जेमतेम ७४६ कोटी झाला. १९६४–६५ चा अंदाज व खर्च यातही काहीशी तफावत असून अद्याप वार्षिक खर्च रु. १००० कोटीपर्यंत गेलेला नाही. तेव्हा यापुढे संरक्षणावर एकदम फार मोठ्या प्रमाणावर खर्च करणे अंमलबजावणीच्या दृष्टीने शक्य दिसत नाही, म्हणून खर्चाची रक्कम नुसती वाढवून ठेवण्यातही अर्थ नाही. काही वृत्तपत्रीय लिखाणात म्हटले जाते की लढाईच्या काळात दररोज अडीच कोटी रुपयाहून अधिक खर्च होत होता. यात नवे काहीच नाही. लढाई नव्हती तेव्हाही जवळजवळ तेवढाच खर्च होत होता. लढाई सुरू झाली की खर्च वाढतो याचे दोन अर्थ आहेत. एक तर आधी उत्पादन करून ठेवलेल्या शस्त्रास्त्रांचा व साधनसामग्रीचा नाश होतो. यात नुकसान होत असले तरी ते भरून काढण्यासाठी ताबडतोब खर्च करणे शक्य नसते. त्यामुळे तिजोरीवरील प्रत्यक्ष ताण त्याक्षणी वाढत नाही. दुसरा अर्थ म्हणजे पेट्रोल व तत्सम





अनुक्रमणिका

बाबींवरील खर्च वाढणे. याचा ताण त्याक्षणी तिजोरीवर पडतो, पण एकंदर संरक्षणखर्चाच्या मानाने तो अगदीच क्षुल्लक असतो. तेव्हा प्रत्यक्ष लढाई चालू असो वा नसो, संरक्षणखर्चात एकदम फार मोठी वाढघट संभवत नाही. युद्धात झालेले नुकसान भरून काढणे हा एका अर्थी सामर्थ्य वाढविण्याचाच एक भाग असतो. मनुष्यदळ उभारण्यासाठी प्रशिक्षण वगैरेवर होणारा खर्च व शस्त्रास्त्रे, साधनसामग्री यांच्या उत्पादनावर होणारा खर्च जितका वाढविता येईल तितकी संरक्षणतयारी वाढेल. पण वर म्हटल्याप्रमाणे अंमलबजावणीच्या दृष्टीने यावर मर्यादा पडलेल्या असतात. म्हणून नुकत्याच झालेल्या पाक-भारत युद्धामुळे संरक्षणावरील खर्चात गेल्यावर्षीपेक्षा एकदम फार मोठ्या प्रमाणावर वाढ करावी लागेल किंवा करता येईल असे दिसत नाही. संरक्षण पंचवार्षिक योजनेतील गृहीत धरलेला खर्च हाच स्थूलमानाने चौथी पंचवार्षिक योजना बनविताना ध्यानी घेतला पाहिजे.

ता. १३ ऑक्टोबर १९६५ रोजी संरक्षणमंत्रालयाने नियोजनमंडळाला जे निवेदन पाठविले त्यावरूनही वरील विधानाला पुष्टी मिळते. ( टाइम्स ऑफ इंडिया, १५-१०-६५ ) संरक्षणमंत्रालयाच्या निवेदनात संरक्षणखात्याला लागणाऱ्या वस्तू व साधनसामग्रीविषयी तपशील दिला आहे; पण गेल्यावर्षीपेक्षा फार मोठ्या प्रमाणावर खर्च करावा लागेल असे मात्र सूचित केलेले नाही.

## अण्वस्त्रनिर्मितीचा प्रश्न

संरक्षण प्रयत्नावरील खर्च एका बाबीमुळे मात्र वाढण्याची शक्यता आहे. चीनने अण्वस्त्राचा स्फोट केल्यापासून भारतानेही अण्वस्त्रे बनवावीत असे एक मत देशात आग्रहाने मांडले जात आहे. मर्यादित युद्धात ( localised war ) अण्वस्त्र वापरता येत नाही, मग ती बनवायची तरी कशाला, विनाकारण व न परवडणारा भरमसाट खर्च करा कशाला अशी दुसरी बाजू मांडली जाते. तीत खूपच तथ्य आहे. पण सध्याची आंतरराष्ट्रीय परिस्थिती पाहता भारताला स्वतःची अण्वस्त्रे बनविणे भाग पडण्याचीही शक्यता आहे. किमानपक्षी त्या बाबतचा राजकीय निर्णय झाल्याबरोबर त्याची त्वरेने अंमलबजावणी करता येईल इतपत तयारी करून ठेवणे आवश्यक आहे. सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ डॉ. राजकृष्ण यांनी सुचविल्याप्रमाणे अणुबॉंब तयार न करता छोटी अण्वस्त्रे ( tactical nuclear weapons ) तयार करणे कदाचित अधिक उपयुक्त ठरेल. या दृष्टीने चौथ्या योजनेच्या काळात सुमारे रु. २०० ते ५०० कोटी संरक्षणाच्या बाबीवर जादा खर्च करावे लागतील.

संरक्षण प्रयत्नामुळे चौथ्या योजनेवर यापेक्षा फारसा ताण पडेल असे दिसत नाही.

## परकीय मदतीची अनिश्चितता

पाक-भारत युद्धामुळे एक गोष्ट मात्र स्पष्ट झाली आहे. ती ही की आपल्या आर्थिक विकासासाठी परदेशाकडून फार मोठ्या प्रमाणावर मदत मिळण्याची शक्यता गृहीत धरता कामा नये. जी काही आखणी करावयाची ती संपूर्णतया देशांतर्गत साधनसामग्रीच्या बळावरच करावी लागेल. परदेशी मदत मिळाली तर तिच्यातून काही जादा कार्यक्रम पार पाडता येतील असे मानावे. हा स्वावलंबनाचा दृष्टिकोन स्वीकारण्याचे ठरविले तर मात्र चौथ्या योजनेत बरीच काटछाट करावी लागेल. योजनेवर नियोजित खर्चाची उभारणी पुढीलप्रमाणे करण्याचा नियोजन मंडळाचा इरादा होता :- एकूण रु. २१,५०० कोटींपैकी रु. ७००० कोटी खाजगी क्षेत्रात उभारले जावेत व बाकीचे रु. १४,५०० कोटी सरकारी क्षेत्रात उभारावेत. ते येणेप्रमाणे--

| | कोटी रु. |
|---|---|
| १. चालू जमेतून शिल्लक | १,२५० |
| २. जादा करवाढ | २,६५० |
| ३. रेल्वेकडून मदत | ३०० |
| ४. सरकारी उद्योगधंद्यातील नफा | ४५५ |
| ५. अंतर्गत कर्जे | २,४०० |
| ६. प्रॉव्हिडंड फंड ( निव्वळ ) | ५२५ |
| ७. पोलाद समीकरण फंड | ५० |
| ८. भांडवली वसुलीचा वाढावा | १,१७० |
| ९. परदेशी मदत | २,५०० |
| १०. तुटीचा अर्थभरणा | ८०० |
| एकूण | १२,१०० |

याचा अर्थ रु. २४०० कोटी कसे उभारावेत याची तरतूद केलेली नव्हतीच. शिवाय परकीय मदत रु. २५०० कोटींची गृहीत धरली होती. सध्याच्या परिस्थितीत असे दिसते की परदेशी मदत फारच कमी प्रमाणावर–म्हणजे सुमारे रु. ७०० ते ८०० कोटींपर्यंत गृहीत धरणे शहाणपणाचे ठरेल. चलन-वाढीचा धोका टाळण्यासाठी तुटीचा अर्थभरणा न करण्याचे ठरविणेही अत्यावश्यक आहे. आणि तरतूद न केलेल्या रकमेच्या आधारावर योजना आखणे निदान सध्याच्या परिस्थितीत तरी आत्मघातकीपणा-चेच ठरेल. तेव्हा सरकारी क्षेत्रात सुमारे रु. ९५०० ते १०,००० कोटी रुपये खर्च करता येतील असे दिसते. याचा अर्थ एकूण योजना सुमारे रु. १७००० कोटींची करावी लागेल.

अंतर्गत साधनसामग्रीची उभारणी करण्यात आणखी प्रयत्नाला बराच वाव आहे. तसे झाले तर योजनेवरील खर्चाच्या वरील आकड्यात त्याप्रमाणात वाढ होऊ शकेल. याचा विचार नंतर करू. श्री. अशोक मेहतांनी ता. ९ आक्टोबर रोजी कलकत्ता येथे सांगितले की चौथ्या योजनेवर पूर्वी योजल्याप्रमाणे रु. २१, ५०० कोटीचा खर्च करण्याचा निर्धार कायम आहे, मात्र १९६६–६७ या वर्षासाठी फक्त रु. २०८० कोटी खर्च केले जातील. हा आकडा सरकारी क्षेत्रासाठीचा असेल असे गृहीत धरले तरी मग पाच वर्षात रु. २१,५०० कोटींपर्यंत खर्च करणे कसे काय शक्य होईल याचे गूढ वाटते. पहिल्या वर्षी रु. २०८० कोटी इतकी कमी रक्कम खर्च करून राहिलेल्या चार वर्षात दरवर्षी सरासरी रु. ३००० खर्च करणे अंमलबजावणीच्या दृष्टीने कितपत शक्य होईल याची शंका येते. तेव्हा एकूण योजनेवरील खर्च रु. २१,५०० ऐवजी रु. १७००० ते १८००० कोटींपर्यंत कमी करण्याचे धोरण ठेवणे अधिक शहाणपणाचे होईल. सध्याच्या आंतरराष्ट्रीय परिस्थितीत परकीय खाजगी भांडवलाच्या आयातीचे प्रमाण बरेच कमी होईल व परिणामतः खाजगी क्षेत्रातील रु. ७००० कोटीचे लक्ष्य साध्य होणे कठीण जाईल हेही ध्यानात घेतले पाहिजे.

### प्रत्यक्ष करवाढीवर भर हवा

मुख्यतः अंतर्गत साधनसामग्रीच्या भरंवशावर चौथी योजना आखणे आवश्यक असले तरी तिचा आकार फार कमी होऊ देणेही योग्य नाही. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेत सरासरी दरवर्षी पाच टक्क्याने राष्ट्रीय उत्पन्न वाढेल असा अंदाज होता. पण पहिल्या दोन वर्षी तर २.५% व २.१°/० अशी वाढ झाली असून नंतरच्या तीन वर्षात देखील ४°/० पर्यंत वाढीचा वेग जाईल असे दिसत नाही. चौथ्या योजनेत रु. २१,५०० कोटी खर्च केले तर दरवर्षी सरासरी ५ टक्क्याने वाढ होईल असा नियोजनमंडळाचा अंदाज आहे. पाच नाहीतर निदान साडेचार टक्के वाढीचा वेग साधणे आवश्यक आहे, अन्यथा सर्वसाधारण नागरिकाचे जीवनमान वाढविणे तर काय, पण संरक्षण-तयारी पुरेशा प्रमाणात करणेदेखील शक्य होणार नाही. तेव्हा एकीकडे चौथ्या योजनेवरील खर्चाचा आकडा काही अंशी कमी करत असताना तो फार कमी न करण्याचीही दक्षता घेतली पाहिजे व त्यासाठी अंतर्गत साधनसामग्रीच्या उभारणीवर भर दिला पाहिजे.

तशी शक्यताही आहे. प्रत्यक्ष करांचे प्रमाण वाढविणे, नियोजन प्रभावी होण्याच्या दृष्टीने आवश्यक ते संस्थात्मक बदल करणे व काही अनावश्यक खर्च बंद करणे हे मार्ग अवलंबायला पाहिजेत. यादृष्टीने पुढील सूचना कराव्याशा वाटतात.

( १ ) इन्कमटॅक्सचे प्रमाण किमान ५० टक्क्यापर्यंत नेणे. सध्या भारतातील सर्वोच्च उत्पन्न गट आपल्या अर्जित उत्पन्नाच्या जेमतेम २४.६°/० इन्कमटॅक्स भरतो. अमेरिका व इंग्लंडमध्ये हे प्रमाण अनुक्रमे ६९°/० व ७८°/० आहे. तेव्हा भारतात ५०°/० करायला काहीच हरकत नाही. तसे केले तर १९६६–६७ साली सुमारे रु. ४५० कोटी जादा मिळतील व त्यानंतर दरवर्षी हे प्रमाण वाढत राहील.

( २ ) शेती उत्पन्नावर इन्कमटॅक्स बसविणे. प. बंगाल, ओरिसा व बिहार राज्याच्या मुख्य मंत्र्यां-बरोबरच्या वाटाघाटीत श्री. अशोक मेहतांनी सुचविले की शेतसारा २५ टक्के व बागायती शेतीवर काही अधिक टक्के वाढवावा. पण हे योग्य नाही. कारण शेतसारा वाढविल्याने गरीब शेतकऱ्यावरील बोजा विनाकारण वाढतो तर श्रीमंत शेतकऱ्याला खूपच सवलत मिळते. म्हणून शक्यतर शेतसारा रद्दच करून



अनुक्रमणिका






सर्व शेतीउत्पन्नावर सध्याच्या इन्कमटॅक्स पद्धतीने कर बसविला जावा. त्यामुळे जिराईत ५४ व बागायती ८ एकर किंवा अधिक शेती करणारावरच त्याचा बोजा पडेल व उत्पन्नात दर वर्षी कमीतकमी रु. १५० कोटींची भर पडेल.

( ३ ) परदेशी व्यापार, बँका व विमा कंपन्या यांचे राष्ट्रीयीकरण करणे नियोजन प्रभावी करण्याच्या दृष्टीने आज अपरिहार्य झाले आहे. राष्ट्रीयीकरणाच्या या कार्यक्रमामुळे दरवर्षी सुमारे रु. १३५ कोटी सरकारला जादा मिळू लागतील.

( ४ ) संस्थानिकांचे तनखे, दारुबंदी यासारखे खर्चिक व निरर्थक खर्च रद्द केले तर दरवर्षी सुमारे ३० कोटींची बचत होईल.

( ५ ) जमीनदारी नष्ट करताना सुमारे रु. ६३० कोटी नुकसानभरपाई देण्याचे बंधन सरकारने स्वीकारले आहे. वास्तविक इतकी नुकसानभरपाई देण्याचे काही कारण नाही. श्रीमंत जमीनदारांना नुकसानभरपाईचे यापुढील हप्ते न देण्याचे ठरविले तर सुमारे रु. २०० कोटींची बचत होईल. मात्र ती एकदाच होईल. दरवर्षी होणार नाही.

वरीलपैकी पहिल्या चार सूचनांमुळे दरवर्षी सुमारे रु. ७६५ कोटींनी उत्पन्न वाढेल, याचा अर्थ पंच-वार्षिक योजनेसाठी रु. ३८२५ कोटी उभारता येतील. नियोजनमंडळाच्या सध्याच्या रु. २६०० कोटीच्या अंदाजापेक्षा ही रक्कम सुमारे दीडपट आहे. तेव्हा तो मार्ग चोखाळायला हरकत नाही.

अप्रत्यक्ष करांचे प्रमाण वाढविण्याच्या दृष्टीने काही सूचना केलेल्या नाहीत. त्याचे कारण असे की सध्याची किंमतपातळी, उत्पन्नप्रमाण व अप्रत्यक्ष करांचे प्रमाण पाहता ते वाढविणे योग्य होणार नाही, त्यांचा बोजा ज्या बहुसंख्य वर्गावर पडतो त्याला तो झेपणार नाही.

## अंमलबजावणी डोळस व काटेकोर हवी

चौथ्या योजनेच्या आकारात काटछाट करणे अपरि-हार्य असले तरी ती मर्यादित प्रमाणात करावी, पण तिच्यातील प्राधान्यक्रमात व कार्यक्रमात मात्र मूलगामी बदल करावे लागणार आहेत, शेतीउत्पादन व शेती आणि संरक्षणाला पोषक ठरेल अशा स्वरूपाचे औद्योगिक उत्पादन वाढविण्यावर भर दिला पाहिजे. सध्या जे उद्योगधंदे चालविण्यासाठी कच्चामाल व मध्यम वस्तु ( intermediary goods ) आयात कराव्या लाग-तात तो कच्चा माल व वस्तू देशांतर्गत बनविण्यावर भर दिला जावा. त्यासाठी अगदी नवे उद्योगधंदे काढण्याचे कार्यक्रम रद्द करावे लागतील.

आपल्या नियोजनातील मुख्य उणीव दिसते ती अंमलबजावणीतील. तेव्हा ती निर्दोष, डोळस व परि-णामकारक कशी होईल यावर संबंधितांनी लक्ष केंद्रित केले पाहिजे. कार्यालयीन क्रांती घडवून आणण्यात अपयश आले तर रणांगणावरही अपयश येईल हे सतत ध्यानी बाळगले पाहिजे.

---










डॉ. वा. वि. मिराशी

# डॉ. काणे आणि भवभूतिविषयक काही प्रश्न

गेल्या तीस वर्षात भवभूतिविषयक काही प्रश्नांची चर्चा करून त्यावर जास्त प्रकाश टाकण्याचा प्रयत्न मी केला होता. भवभूतीचे जन्मस्थान, त्याचे उपनाम त्याचे जीवनचरित, त्याच्या नाटकात उल्लेखिलेला कालप्रियनाथ, तो व उम्बेक एक किंवा भिन्न इत्यादी भवभूतिविषयक विविध प्रश्नांवरचे माझे लेख नियतकालिकात प्रसिद्ध झाले होते. आता ते 'संशोधनमुक्तावलीच्या काही सरा'त एकत्र केले आहेत[1]. वर उल्लेखिलेले सर्व प्रश्न वादग्रस्त आहेत. त्यामुळे त्यांची चर्चा करताना पूर्वगामी संशोधकांची मते कशी चूक आहेत हे दाखवावे लागले. यात सत्यान्वेषणाशिवाय दुसरा हेतु नव्हता. तथापि त्यात इतरांप्रमाणे महामहोपाध्याय डॉ. पां. वा. काणे यांचीही मते खोडली असल्याने त्यांना त्याचा राग आलेला दिसतो. त्यांनी अलीकडे मोतीलाल बनारसीदास यांनी प्रकाशित केलेल्या आपल्या 'उत्तर रामचरिता'च्या चौथ्या आवृत्तीत माझ्या प्रत्येक प्रश्नविषयक मताची कसून छाननी करून त्यातील दोष दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. वादग्रस्त प्रश्नांची चर्चा होणे अवश्य आहे, पण त्यात वकीली डावपेच नसावे. केवळ सत्यान्वेषण दृष्टी असावी. कालान्तराने नवीन पुरावा पुढे आल्यावर आपले पूर्वीचे मत अग्राह्य ठरले तर त्याचे वैषम्य न वाटता त्यामुळे आनंदच व्हावा. दुर्दैवाने सध्या संशोधनक्षेत्रात ही वृत्ती फारशी आढळत नाही. एखाद्याच्या मतावर टीका केली तर तो त्यातील ग्राह्यांश न घेता नाराज होतो. हे अत्यन्त अनिष्ट आहे.

डॉ. काणे हे माझे गुरु होते. एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये भरणाऱ्या कायद्याच्या वर्गामध्ये मी शिकत असताना त्यांनी मला सिव्हिल प्रोसीजर कोड शिकविले होते. आपल्या गुरूच्या मतावर टीका करताना मन कष्टी होते. पण सत्य हे कोणत्याही व्यक्तीपेक्षा श्रेष्ठ आहे. संशोधन म्हणजे सत्याच्या आविष्कारार्थ केलेला प्रयत्न. केवळ सत्यान्वेषण दृष्टीने येथे त्यांच्या मतांचे परीक्षण करावयाचे आहे. पुढे प्रत्येक प्रश्नावर त्यांचे मत त्यांनी दिलेल्या प्रमाणासह शक्यतों त्यांच्या शब्दात मांडून नंतर त्याचे परीक्षण केले आहे.

## प्रश्न पहिला– भवभूतीचे जन्मस्थान.

भवभूतीच्या 'पद्मपुर' या जन्मस्थानाविषयी विविध मते प्रचलित होती. ग्वाल्हेर संस्थानांतील पदम पवाया (पूर्वीची पद्मावती), चांद्याजवळचे पद्मापूर इत्यादिकांशी त्याचे ऐक्य काही विद्वानांनी प्रतिपादिले होते. त्या सर्व मतांचा विचार करून ते भंडारा जिल्ह्यातील आमगांवाजवळचे पद्मपूर असावे हे तेथील अवशेषांवरून तीस वर्षांपूर्वी मी प्रथम दाखविले.[2] सुदैवाने वाकाटक कालीन एक अपूर्ण ताम्रपट त्याच सुमारास हाती आल्याने पद्मपूर हे वाकाटक काळी– भवभूतीच्या पूर्वी सुमारे दोनशे वर्षे– विदर्भात अस्तित्वात होते. इतकेच नव्हे तर त्या ताम्रपटातील त्याच्या निर्देशावरून ते वाकाटकांच्या राजधानीचे शहर असावे असे अनुमान करता आले. तो ताम्रपट भंडारा जिल्ह्याच्या पूर्वेकडच्या दुर्ग जिल्ह्यात सापडला होता, त्यामुळे पद्मपूर हे भंडारा जिल्ह्यातील, या मताला बळकटी आली. वाकाटकांचे राज्य या प्रदेशावर होते हे त्यांच्या दुसऱ्या एका ताम्रपटातील गावे उपरिनिर्दिष्ट पद्मपुराच्या आसमंताद्भागी अद्यापि सापडतात हे दाखवून मी सिद्ध केले. हा सर्व पुरावा येथे देत नाही. जिज्ञासु वाचकास तो माझ्या 'संशोधनमुक्तावलि, सर १' पृ. ७६–९४, यावर सापडेल.

## डॉ. काणे यांचे आक्षेप

या माझ्या मतावर डॉ. काणे यांनी पुढील आक्षेप घेतले आहेत–

---

१ संशोधनमुक्तावलि, सर १, पृ. ७६-१०३; सर २, पृ. ४१-४५; सर, ३ पृ. १०-६१.

२ 'सह्याद्रि' पुणे, मे, १९३५; संशोधनमुक्तावलि सर १, पृ. ७६ इत्यादी.

(१) प्रा. मिराशी यांनी चांदा व भंडारा जिल्ह्यात पद्मपूर या नावाची सहा खेडी आहेत असे म्हटले आहे. त्यापैकी कोठेही उत्खनन झाले नसल्यामुळे त्यापैकी एखादे भवभूतीचे पद्मपूर नसेल कशावरून ?

(२) एका अपूर्ण ताम्रपटात 'पद्मपूर' या स्थलनामाबरोबर 'स्थानात्', 'वासकात्', 'स्कन्धावारात्' या सारखा शब्द नसल्यामुळे ते पद्मपूर वाकाटकांच्या राजधानीचे शहर होते हे अनुमान फार दूर उडी मारण्यासारखे आहे. वाकाटकांच्या नन्दिवर्धन, प्रवरपूर अशा इतरही राजधान्या होत्या. प्रस्तुत ताम्रपट भंडारा जिल्ह्यातील पद्मपुरापासून शंभर मैलावर किंवा कदाचित् त्यापेक्षाही दूर अंतरावर दुर्ग जिल्ह्यात सापडला होता आणि त्यात पद्मपूर या नावाखेरीज अधिक माहिती नाही. केवळ एखाद्या शब्दाच्या प्रयोगामुळे किंवा अभावामुळे काढलेली अनुमाने कशी चूक असण्याचा संभव असतो हे एका उदाहरणाने दाखविता येईल. प्रा. मिराशी यांनी राष्ट्रकूट नृपती तृतीय इंद्र याने जे महोदयनगर उद्ध्वस्त केले ते प्रतीहार राजांची राजधानी कनौज होय असे म्हटले आहे. पण गुर्जर-प्रतीहार नृपती भोज याच्या बरा येथे सापडलेल्या ताम्रपटात महोदयाचा स्कन्धावार (शिबिर) म्हणून उल्लेख आला आहे आणि त्याच ताम्रपटात इतरत्र कान्यकुब्जाचा निर्देश आहे. त्यावरून ही दोन स्थले भिन्न आहेत हे दिसते. या उदाहरणावरून पद्मपुराबरोबर 'वासकात्', 'स्कन्धावारात्' असे पद नसल्यामुळे ते नगर राजधानी असावे या प्रा. मिराशी यांच्या मताविषयी बळकट संशय उत्पन्न होतो.

(३) प्रस्तुत अपूर्ण ताम्रपट बनावट असावा. याच्या विरुद्ध काही कारणे आहेत काय ? प्राचीन काळीही अनेक बनावट ताम्रपट प्रचारात होते. फ्लीटने अशा ४९ बनावट कोरीव लेखांची यादी प्रसिद्ध केली आहे. तीत ४४ ताम्रपट आहेत.

## आक्षेपांस उत्तरे

वरील आक्षेपांमुळे डॉ. काणे यांनी एके ठिकाणी भवभूतीचे जन्मस्थान पद्मपूर हे भंडारा जिल्ह्यातील पद्मपूर होय हे मत तात्पुरते (as a tentative proposition) मान्य करण्यास आपण तयार आहो असे म्हटले असले तरी इतरत्र प्रा. मिराशींचे अनुमान फार थोड्या पुराव्यावर आधारलेले असल्यामुळे ते सध्याच्या परिस्थितीत मुळीच स्वीकारू नये असे ठासून सांगितले आहे. तेव्हा या आक्षेपांचा विचार केला पाहिजे.

## भंडारा जिल्ह्यातील पद्मपुराच्या प्राचीनत्वाचा पुरावा

**आक्षेप पहिला** – विदर्भातील कोणत्याही पद्मपूर गावात उत्खनन झाले नाही हे खरे आहे. पण उत्खननाने तरी निर्णायक पुरावा हाती येतो असे थोडेच आहे. उज्जयिनी, हस्तिनापूर, पाटलिपुत्र येथे उत्खनन झाले आहे, पण तेथे त्या शहरांची नावे असलेला एक तरी लेख किंवा नाणे सापडले आहे काय ? असा पुरावा सापडेपर्यंत उपलब्ध प्रमाणांवरून अनुमाने काढली पाहिजेत. भंडारा जिल्ह्यातील आमगावाजवळच्या पद्मपुरात विष्णू, शिव इत्यादी हिंदु देवांच्या व जैन तीर्थंकरांच्या प्राचीन मूर्ती, देवळांचे अद्यापि उभे असलेले खांब, विशाल गणेशपट्टी यासारखे अनेक अवशेष दृष्टीस पडतात. त्यांचे विस्तृतवर्णन आम्ही आपल्या लेखात छायाचित्रांसह केले आहे. हा प्रदेश भवभूतीच्या पूर्वी वाकाटकांच्या अमलाखाली होता हेही दाखविले आहे. पद्मपूरच्या सभोवारची वनश्री भवभूतीच्या उत्तररामचरित्रातील दंडकारण्याच्या वर्णनास जुळेल अशी आहे हेही दाखविले आहे. इतका पुरावा असता हे अनुमान का ग्राह्य होऊ नये ? यापेक्षा निराळे ठिकाण भवभूतीचे जन्मस्थान पद्मपूर आहे असे आक्षेपकांना म्हणावयाचे असल्यास तेथे यापेक्षा बळकट पुरावा आहे असे दाखवावयास पाहिजे होते. प्राचीन भारतीय इतिहासाची साधने इतकी अत्यल्प आहेत की जी उपलब्ध आहेत त्यावरूनच अनुमाने काढावी लागतात.

## पद्मपूर ही वाकाटकांची राजधानी होती

**आक्षेप दुसरा** – वाकाटककालीन दुर्ग ताम्रपटात पद्मपुराबरोबर 'स्थानात्', 'वासकात्' 'स्कन्धावारात्' असा एखादा शब्द नसल्यामुळे पद्मपूर हे वाकाटकांची राजधानी असावे या आमच्या अनुमानावरील डॉ. काणे यांचा आक्षेपही असाच पोकळ आहे.

आतापर्यंत वाकाटकांचे आणि त्यांच्या मंत्र्यांचे व मांडलिकांचे एकूण २८ लेख सापडले आहेत. त्यापैकी एक शिलालेख अप्रकाशित असून बाकीचे २७ लेख मी वाकाटक राजवंशावरील माझ्या इंग्रजी,[३] मराठी[४] व हिंदी[५] ग्रंथात प्रकाशित केले आहेत. त्यापैकी सात शिलालेख किंवा गुहालेख आहेत. त्यांत आरंभी स्थानाचा उल्लेख नसतो, राहिलेल्या ताम्रपटांपैकी काही अपूर्ण सापडले आहेत आणि काही मांडलिकांचे आहेत. त्यात राजनिवासस्थलांचा निर्देश उपलब्ध नाही किंवा प्रस्तुत विवेचनास उपयुक्त नाही. वाकाटकांच्या ज्या ताम्रपटात तो आला आहे त्यात तो खाली * दिल्या प्रमाणे आहे. ( लेखांचे क्रमांक माझ्या इंग्रजी पुस्तकातल्याप्रमाणे आहेत. )

येथे उल्लेखिलेल्या १४ ताम्रपटात ते जेथून दिले त्या स्थानाचा आरंभी उल्लेख आला आहे. वाकाटक वंशाच्या दोन शाखांचे लेख आतापर्यंत सापडले आहेत– ( १ ) ज्येष्ठ शाखा– हिची राजधानी प्रथम नन्दिवर्धन व नंतर प्रवरपूर होती हे सर्वमान्य आहे. ( २ ) वाशीम शाखा– हिची राजधानी वत्सगुल्म (सध्याचे वाशीम) होती. वरील ताम्रपटात राजधान्यांचा उल्लेख फक्त त्यांचे नाव पंचमी विभक्तीत घालून केला आहे. इतर ठिकाणांचा उल्लेख स्थलनामाशी 'वासकात्' किंवा 'स्थानात्' जोडून केला आहे. क्रमांक १७ च्या दुर्गताम्रपटांतील उल्लेख 'पद्मपुरात्' असा 'वासका'दि-शब्दविरहित केला असल्यामुळे ते पद्मपूर वाकाटकांच्या एकेकाळच्या राजधानीचे शहर होते हे अनुमान लांब उडी मारण्यासारखे होते काय हे वाचकांनी ठरवावे. पूर्वीची राजधानी बदलण्याचे कारण नलवंशी भवदत्तवर्म्याचे विदर्भावरील आक्रमण आणि नन्दिवर्धनावर ताबा हे असावे हेही मी माझ्या लेखात सविस्तर दाखविले होते.

भंडारा जिल्ह्यांतील पद्मपुरापासून १०० मैल दूर अंतरावर दुर्ग जिल्ह्यात त्या स्थलाचा उल्लेख असलेला

---

३ कॉर्पस् इन्स्क्रिप्शनम् इंडिकॅरम्, व्हॉ. ५.

४ वाकाटक नृपति आणि त्यांचा काल.

५ वाकाटक राजवंश का इतिहास तथा अभिलेख मराठी व हिंदी ग्रंथांत एका ताम्रपटाचा फक्त सारांश दिला आहे.

* वाकाटकाचे ताम्रपट–

| क्रमांक | ताम्रपटाचे नांव | स्थलनिर्देश |
|---|---|---|
| २ | प्रभावती गुप्तेचा पुणे ताम्रपट– | नान्दिवर्धनात् । |
| ३ | द्वितीय प्रवरसेनाचा जांब ताम्रपट– | नन्दिवर्धनात् । |
| ४ | द्वितीय प्रवरसेनाचा बेलोरा ताम्रपट– | नान्दिवर्धनात् । |
| ६ | द्वितीय प्रवरसेनाचा चम्मक ताम्रपट– | प्रवरपुरात् । |
| ८ | प्रभावती गुप्तेचा ऋद्धपुर ताम्रपट– | रामगिरिस्वामिनः पादमूलात् । |
| १० | द्वितीय प्रवरसेनाचा दुदिया ताम्रपट– | प्रवरपुरात् । |
| ११ | द्वितीय प्रवरसेनाचा तिरोडी ताम्रपट– | नरत्तङ्गवारिस्थानात् । |
| १२ | द्वितीय प्रवरसेनाचा वडगाव ताम्रपट– | हिरण्यानदीवासकात् । |
| १३ | द्वितीय प्रवरसेनाचा पट्टण ताम्रपट– | प्रवरपुरात् । |
| १४ | द्वितीय प्रवरसेनाचा पांढुर्णा ताम्रपट– | प्रवरेश्वरदेवकुलस्थानात् । |
| १७ | दुर्ग येथील अपूर्ण ताम्रपट– | पद्मपुरात् । |
| १८ | द्वितीय पृथिवीषेणाचा बालाघाट येथील अपूर्ण ताम्रपट– | वेम्बारवासकात् । |
| २३ | द्वितीय विन्ध्यशक्तीचा वाशीम ताम्रपट– | वत्सगुल्मात् । |
| २४ | देवसेनाचा इंडिया ऑफीस ताम्रपट– | वात्स्यगुल्मात् । |



अनुक्रमणिका

प्रस्तुत अपूर्ण ताम्रपट सापडला होता आणि त्यात पद्मपूर या नावाखेरीज काही माहिती नाही असा आक्षेप डॉ. काणे यांनी घेतला आहे. ताम्रपट ही वस्तू आपणाबरोबर सहज नेण्यासारखी असल्याने तो मूळच्या ठिकाणाहून दूर अंतरावर सापडल्यास आश्चर्य नाही. यापेक्षाही जास्त दूर अंतरावर सापडलेल्या एक दोन ताम्रपटांची माहिती येथे देतो म्हणजे या आक्षेपात तथ्य नाही हे वाचकांच्या ध्यानात येईल. प्रभावती गुप्तेचा पुणे–ताम्रपट त्या शहरात ज्याच्याजवळ सापडला तो कासार मूळचा अहमदनगरचा होता. पण तो ताम्रपट मूळचा पुणे किंवा अहमदनगर येथील नसून विदर्भाच्या वर्धा जिल्ह्यातील होता हे त्यातील सुप्रतिष्ठ आहाराचा व त्यातील निर्दिष्ट ग्रामनामांचा शोध वर्धा जिल्ह्याच्या हिंगणघाट तहसिलीत लावून मी दाखविले आहे. पुण्यापासून हिंगणघाटचे अंतर ५०० मैलांपेक्षा जास्त भरेल. दुसरे यापेक्षाही विलक्षण उदाहरण पूर्वकालीन चालुक्य नृपती विनयादित्य याच्या कोंकणातील चेमूल्य ( चौल ) प्रदेशातील गावाचे दान करणारा ताम्रपट पंजाबात पतोडा येथे सापडला होता त्याचे या दोन स्थलातील अंतर किती आहे हे डॉ. काणे पाहावे.

प्रस्तुत ताम्रपटात 'पद्मपुर' या नावाशिवाय आणखी काही माहिती येत नाही खरे, पण कोणत्या ताम्रपटात ती तशी येते ? प्रवरपूर या वाकाटकांच्या राजधानीचा केवळ निर्देश ताम्रपटात येतो. पवनार जवळ सापडलेल्या शिल्पपट्टांमुळे व देवळाच्या अवशेषांमुळे तेच पूर्वीचे प्रवरपूर असे आता निश्चित झाले आहे. आमगावाजवळच्या पद्मपुरात अशी शिल्पे व अवशेष आहेत हे मी सविस्तर दाखविले आहे.

## महोदय व कन्नोज ही भिन्न नव्हत

केवळ एखाद्या शब्दाच्या प्रयोगावरून किंवा अभावावरून अनुमान काढले असता ते कसे चूक ठरते ते राष्ट्रकूट नृपती तृतीय इन्द्र याच्याविषयी खंबायतच्या ताम्रपटात[६] आलेल्या खालील श्लोकांच्या माझ्या स्पष्टीकरणावरून दाखविण्याचा प्रयत्न डॉ. काणे यांनी केला आहे. तो श्लोक असा[७]

यन्माद्यद्द्विपदन्तघातविषमं कालप्रियप्राङ्गणम्
तीर्णा यत्तुरगैरगाधयमुना सिन्धुप्रतिस्पर्धिनी ।
येनेदं हि महोदयारिनगरं निर्मूलमुन्मूलितम्
नाम्नाद्यापि जनैः कुशस्थलमिति ख्यातिं
परां नीयते ॥

– तृतीय इन्द्राने गुर्जर-प्रतीहार राजांची राजधानी कन्नोज यावर स्वारी करून ते उद्ध्वस्त केले त्याचे हे वर्णन आहे. याचा अर्थ असा –

तृतीय इन्द्राच्या मदोन्मत्त हत्तींच्या दंतांच्या आघातांनी कालप्रियाचे प्रांगण उंच सखल झाले. त्याच्या घोड्यांनी सागराशी विशालत्वात स्पर्धा करणारी यमुना पोहून पार केली. त्याने समूळ उद्ध्वस्त केल्यामुळे ही महोदय ( कन्नोज ) नामक शत्रूंची ( समृद्ध ) राजधानी अद्यापि कुशस्थल या नांवाने लोकात प्रसिद्ध आहे. ( पूर्वीच्या सुसमृद्ध शहरात अद्यापि गवत वाढले आहे असा भावार्थ. )[८]

वरील श्लोकाच्या माझ्या अर्थावर डॉ. काणे यांचा आक्षेप असा– वरील श्लोकावरून प्रो. मिराशी यांनी महोदय हे प्रतीहारांच्या राजधानीचे शहर होते व तेच कन्नोज असे म्हटले आहे. पण प्रतीहार नृपती भोजदेव याच्या बरा ताम्रपटात महोदेवाला स्कन्धावार ( शिबिर ) असे म्हटले आहे आणि त्याच ताम्रपटात कान्यकुब्जाचा निराळा उल्लेख आला आहे. त्यावरून महोदय आणि कान्यकुब्ज ही एक नव्हत.[९]

६ एपि. इंडिका, व्हॉ. ७, पृ ३६ इत्यादि.

७ या श्लोकाचा उल्लेख पुढे अनेक ठिकाणी येईल.

८ महोदय आणि कुशस्थल ही दोन्ही कन्नोजची नावे होती. महोदय आणि कुशस्थल यावर श्लेष आहेत. त्यांचे दुसरे अर्थ अनुक्रमे 'समृद्ध' आणि 'गवताळ जमीन' असे होतात.

९. डॉ. काणे यांचा आक्षेप, 'तसे' त्यानी म्हटले नसले तरी, बरा ताम्रपटाचे संपादक श्री. हीरानन्द शास्त्री यांच्या विधानावर आधारला आहे. एपि. इं., व्हॉ. १९, पृ. १७ पाहा. भोजानंतरचे राजे महेंद्रपाल आणि विनायकपाल यांचेही ताम्रपट महोदययेथील स्कन्धावारातूनच दिले होते. ( इं. अॅ. व्हॉ. १५, पृ. ११२ व १४० पाहा ) त्यावरूनही महोदय ही गुर्जरप्रतीहारांची राजधानी होती हे सिद्ध होते.



अनुक्रमणिका






या आक्षेपात मुळीच तथ्य नाही. बरा ताम्रपटात 'श्रीमहोदयसमावासितानेकनौहस्त्यश्वरथपत्तिसम्पन्न-स्कन्धावारात्' असा महोदयाचा स्कन्धावार म्हणून उल्लेख आला आहे खरा, पण संस्कृतमध्ये 'स्कन्धावार' याचा 'शिबिर' एवढाच अर्थ होत नाही. त्याचा 'राजधानी' असाही अर्थ होतो[१०] आणि त्या अर्थी तो शब्द हर्षचरिताच्या पाचव्या उच्छ्वासात हर्ष आपला पिता प्रभाकरवर्धन हा अतिशय आजारी पडल्याचे समजताच हिमालयातून गडबडीने ठाणेश्वरास परत येतो त्याच्या वर्णनात बाणाने 'स्कन्धावारं समाससाद' असा योजला आहे. स्वतः डॉ. काणे यांनी त्या उताऱ्यावरील आपल्या टिप्पणात तोच अर्थ Capital असा दिला आहे. [हर्षचरित, उच्छ्वास ४ ते ८ (१९१७), नोट्स् पृ. ७१ पाहा.] तेव्हा बरा ताम्रपटात 'स्कन्धावार' म्हणून वर्णिलेले महोदय हे शिबिर नसून राजधानीचे शहर (कन्नोज) होते यात संशय नाही. आता त्या ताम्रपटात श्रीकन्यकुब्जभुक्तीचाही उल्लेख आला आहे खरा, पण त्यावरून कन्यकुब्ज महोदयापासून भिन्न होते असे अनुमान करता येत नाही. अवन्ति आणि उज्जयिनी यांचा जसा संबंध होता तसाच कन्यकुब्ज आणि महोदय यांचा होता. 'अवन्ति' हे देशाचे तसेच नगराचेही नाव होते. तसेच कान्यकुब्ज हे भुक्तीचे आणि नगराचे नाव होते. महोदय मात्र उज्जयिनीप्रमाणे नगराचेच नाव होते. कन्नोजला अनेक नावे होती. स्वतः काणे यांनीच म्हटले आहे की हेमचन्द्राच्या अभिधानचिन्तामणि-कोशात कान्यकुब्ज, कन्याकुब्ज, महोदय आणि गाधिपूर हे शब्द समानार्थक म्हणून दिले आहेत. त्यांनीच महोदय आणि कन्नोज ही एक होत या माझ्या मतावर आक्षेप घ्यावा यातील '**वदतो व्याघात**' पाहून आश्चर्य वाटते.

## दुर्ग ताम्रपट बनावट नाही

**आक्षेप तिसरा**– 'पद्मपुरात्' असा उल्लेख असलेला दुर्ग ताम्रपट बनावट असावा असे डॉ. काणे म्हणतात आणि त्याला प्रमाण म्हणून प्राचीनकाळीही अनेक ताम्रपट बनावट असत असे सांगतात. यासारखे विधान एखाद्या वकीलाच्या तोंडी शोभेल. एखाद्या सभ्य गृहस्थाला 'तुला चोर का म्हणू नये ? कारण येथे अनेक चोर सापडले आहेत' असे म्हणण्यासारखे हे आहे. शेकडो ताम्रपट बनावट म्हणून ठरले असतील, पण जोपर्यंत दुर्ग ताम्रपट बनावट मानण्यास काही कारणे सापडत नाहीत तोपर्यंत तो तसा मानणे योग्य होणार नाही. बनावटपणाच्या काही खुणा असतात. दुर्ग ताम्रपटात आलेली वाकाटकांची वंशावळ अपूर्ण असली तरी बरोबर आहे. त्याची लिपीही त्याच काळातील आहे. तो अपूर्ण आहे हे त्याच्या आरंभी 'दृष्टम्' शब्द कोरला नाही, पण त्याकरिता जागा ठेवली आहे त्यावरून स्पष्ट आहे.[११] त्याच्या शेवटच्या ओळीत एका अक्षराच्या डोक्यावरच्या मात्राच तेवढ्या कोरल्या असून पुढे तीन अक्षरांची जागा राहिली आहे. त्यावरून तो पत्रा पूर्णपणे कोरला जाण्यापूर्वीच कोरक्याला काही कारणाने थांबण्यास सांगितलेले दिसते. हा ताम्रपट बनावट असता तर इतर ताम्रपटातल्याप्रमाणे त्याच्या आरंभी 'दृष्टम्' शब्द कोरला असता. शेवटी काही अक्षरांची जागा सोडण्याचेही कारण नव्हते. तेव्हा हा ताम्रपट बनावट मानण्यास यत्किंचितही कारण नाही.

पद्मपूर हे वाकाटकांच्या राजधानीचे शहर असो वा नसो, त्या नावाचे शहर वाकाटकांच्या काळी-भवभूतीच्या काळापूर्वी निदान २०० वर्षे– विदर्भात अस्तित्वात होते याविषयी प्रस्तुत दुर्गताम्रपटावरून मुळीच संशय राहत नाही. भवभूतीच्या नाटकावरून त्याच्या पूर्वजांचे निवासस्थान पद्मपूर हे दक्षिणापथात विदर्भात होते हे स्पष्ट आहे. भंडारा जिल्ह्यातील आमगावाजवळच्या पद्मपुरात प्राचीन अवशेष आहेत आणि दुर्ग ताम्रपटही तेथून दिला जाणार होता असे मानण्यास सबळ कारणे आहेत. तेव्हा दुसरे एखादे पद्मपूर बलवत्तर पुराव्यावरून भवभूतीचे जन्मस्थान म्हणून सिद्ध होईपर्यंत आमगावाजवळच्या पद्मपुराला तो मान देण्यास हरकत नसावी.

१०. स्कन्धावार इति प्राज्ञै राजधानी निगद्यते । हलायुध, अभिधानरत्नमाला. २,१३१ पहा.

११ वाकाटकांच्या पूर्ण ताम्रपटात आरंभी 'दृष्टम्' असा शब्द आढळतो. द्वितीय पृथिवीषेणाचा बालाघाट ताम्रपटही अपूर्ण असल्याने त्याच्या आरंभी 'दृष्टम्' शब्द नाही.







## भवभूतीच्या नाटकातील कालप्रियनाथ

**प्रश्न दुसरा**- भवभूतीच्या तीन्ही नाटकांच्या प्रस्तावनावरून ती कालप्रियनाथाच्या उत्सवप्रसंगी प्रथम रंगभूमीवर आली असे दिसते. हा कालप्रियनाथ म्हणजे उज्जयिनीचा महाकाल असे मालतीमाधवाचा टीकाकार त्रिपुरारी म्हणतो. हेच मत डॉ. काणे यांनी उत्तररामचरिताच्या पूर्वीच्या आवृत्तीत स्वीकारले होते.[१२] १९४७ साली नागपूरच्या 'युगवाणी' मासिकात कालप्रियनाथ हे शंकराचे नाव नसून सूर्याचे होते असे मत मी वराह व भविष्य पुराणातील उतारे देऊन सिद्ध केले होते. ते उतारे असे—

(अ) भगवान् सूर्य म्हणतात–

सांनिध्यं मम पूर्वाह्णे सुतीरे द्रक्ष्यते जनः ।
कालप्रिये च मध्याह्नेऽपराह्णे चात्र नित्यशः ॥
भविष्यपुराण, १, १२९, १६

यात 'अत्र' म्हणजे चंद्रभागा (चिनाब) नदीवरील मित्रवन (मूलस्थान) येथे.

(आ) साम्बः सूर्यप्रतिष्ठां च कारयामास तत्त्ववित् ।
उदयाचले च संश्रित्य यमुनायाश्च दक्षिणे ॥
मध्ये कालप्रियं देवं मध्याह्ने स्थाप्य चोत्तमम् ।
मूलस्थानं ततः पश्चादस्तमानाचले रविम् ।
स्थाप्य त्रिमूर्तिं साम्बस्तु प्रातर्मध्यापराह्णिकम् ॥
वराहपुराण, १७८, ५५–५७.

या उताऱ्यात सूर्याची तीन मुख्य स्थाने–पूर्वदिशेच्या पर्वतावर (किंवा तीरावर), यमुनेच्या दक्षिण तीरावर कालप्रिय येथे, आणि पश्चिम पर्वतावर मूलस्थान (किंवा मित्रवन) येथे–अशी वर्णिली आहेत. त्या ठिकाणी सूर्यदेव अनुक्रमे प्रातःकाळी, मध्याह्नी आणि सायंकाळी असतो असे म्हटले आहे.

तेव्हा भवभूतीची नाटके ज्याच्या यात्रेच्या प्रसंगी प्रथम रंगभूमीवर आली तो कालप्रियनाथ सूर्यदेव असून त्याचे देवालय यमुनेच्या दक्षिण तीरी काल्पी येथे असावे असे सहजच अनुमान झाले. याला उपोद्बलक पुरावा खंबायतच्या ताम्रपटातून मागे उद्धृत केलेल्या श्लोकात सापडला. त्या श्लोकात म्हटले आहे की राष्ट्रकूट नृपती तृतीय इन्द्राची चतुरंग सेना कालप्रियाच्या विशाल आवारात सामावली होती. तेथून पुढे कनोजवर चालून जाताना त्याच्या घोड्यांना विशाल यमुना पार करावी लागली हे वर्णन यमुनेच्या दक्षिण तीरी असलेल्या काल्पी येथील सूर्यदेवाच्या देवालयाला जुळते. कालप्रियनाथ याने उज्जयिनीचा महाकाल समजल्यास मात्र ते जुळणार नाही.

### डॉ. काणे यांचे आक्षेप

या माझ्या मतावर डॉ. काणे यांनी उत्तर रामचरिताच्या चौथ्या आवृत्तीतील प्रस्तावनेत कडाडून हल्ला चढविला आहे. त्यानी 'कालप्रियानाथ' असा पाठ स्वीकारला असून त्याचा अर्थ भगवान् शंकर असा केला आहे. पण हा भवभूतीचा मूळ पाठ असणे संभवनीय नाही. त्यात 'भवानीपतिः' या शब्दातल्याप्रमाणे[१३] 'विरुद्धमतिकृत्' हा दोष उत्पन्न होतो. (काव्यप्रकाश, उल्लास ७ पाहा.) कालप्रियनाथ याने सूर्यदेव विवक्षित आहे या माझ्या मतावर त्यांचे आक्षेप पुढीलप्रमाणे आहेत–

(१) कालप्रियनाथ म्हणजे उज्जयिनीचा महाकाल. हे दैवत कालिदासाच्या पूर्वीपासून प्रसिद्ध होते. त्या ठिकाणी हजारो लोक यात्रेच्या निमित्ताने जमत. अशा ठिकाणी भवभूतीसारख्या उदयेच्छू कवीला आपली नाटके दाखविणे योग्य व फायदेशीर झाले असावे. भगवान् शिवाला कालप्रियनाथ कोठेही म्हटले नाही खरे, पण त्याला महाभारताच्या अनुशासन पर्वात 'कालपूजितः' आणि शांतिपर्वात 'कालनाथ' म्हटले आहे. ही नांवे 'कालप्रियनाथा'हून भिन्न नाहीत. भवभूतीच्या नाटकात उल्लेखिलेले 'कालप्रियनाथ' हे पूर्ण नाव तरी सूर्यदेवाचे म्हणून पुराणात कोठे येते. तेथे ते 'कालप्रिय' असेच येते. तेव्हा ते कालप्रियनाथ नव्हे.

---

१२. नव्या आवृत्तीत रामचन्द्रबुधेन्द्र या टीकाकाराला अनुसरून कालप्रियनाथ हा पद्मपुरातील शंकर होय असे त्यांनी प्रतिपादिले आहे पण तेथील देवाचे नांव कालप्रियनाथ होते याला प्रमाण नाही.

१३ भवाची पत्नी ती भवानी. तिचा पती भवाशिवाय दुसरा कोणी असा अनिष्ट अर्थ उत्पन्न होतो म्हणून हा दोष.










(२) मागे उद्धृत केलेल्या वराहपुराणातील श्लोकात कालप्रियाचा उल्लेख आला आहे. पण ते पुराण नंतरचे आहे. कारण त्यात 'भविष्यमिति विख्यातं कृत्वा पुनर्नवम् । असे म्हटले आहे. तेव्हा ते पुराण नंतरचे आहे. भविष्यपुराणाच्या काही प्रतीत 'सांनिध्यं मम पूर्वाह्ले सुतीरे द्रक्ष्यते जनैः । कालप्रिये च मध्याह्ने अपराह्ले चात्र नित्यशः ॥' या श्लोकात सुतीरे याच्याबद्दल मुण्डीरे असे नाव आले आहे. हे मुण्डीर म्हणजे उत्तर गुजराथेत पाटण शहरापासून सुमारे १८ मैलावरचे मोढेर येथील सूर्याचे देवालय असावे. हे देवालय विक्रम संवत् १०८३ (सन १०२६) च्या सुमारास बांधले होते. म्हणून वराहपुराणातील हा उतारा अकराव्या शतकानंतरचा दिसतो. तेव्हा ही सूर्याची देवालये सन ७०० च्या अगोदर होती हे सिद्ध करण्यास त्याचा काही उपयोग नाही.

(३) प्रा. मिराशी कोणार्क येथील सूर्याचे देवालय सांबाने बांधले असे म्हणतात ते चूक आहे. सांबाने बांधलेले देवालय उदयाचलावर होते. कोणार्क वाळवंटात आहे. ते देवालय गंग नृपती नरसिंहदेव (सन १२३८–१२६४) याने बांधले.

(४) भवभूतीचीं तीन्ही नाटके कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगी रंगभूमीवर आली. कालप्रियनाथ याने काल्पी येथील सूर्याचे देवालय विवक्षित असल्यास भवभूती काल्पी येथे दीर्घकाल राहिला होता असे मानावे लागेल. त्याला यत्किंचित्ही पुरावा नाही. तो कन्नोजच्या यशोवर्म्याच्या आश्रयास होता असे राजतरंगिणीत म्हटले आहे खरे, पण ते खरे नसावे; कारण राजतरंगिणी भवभूतिनंतर ४०० वर्षांनी लिहिली गेली.

(५) कालप्रियनाथ याने सूर्यदेव विवक्षित असल्यास पुराणात उल्लेखिलेल्या इतर ठिकाणच्या सूर्याची नावे 'नाथ' शब्दान्त (उदाहरणार्थ 'मूलस्थाननाथ' यासारखी) का नसावी ?

(६) राजशेखराने 'काव्यमीमांसे'त कालप्रिय गाधिपुराच्या (कन्नोजच्या) दक्षिणेस आहे असे म्हटले आहे खरे, पण त्यायोगे कालप्रिय हे एक शहर होते एवढेच सिद्ध होईल. तेथें सूर्याचे देवालय होते असे सिद्ध होत नाही.

तेव्हा कालप्रियनाथ हे पद्मपुरातील शंकराचे देवालय असावे. तसे नसल्यास ते उज्जयिनीच्या महाकालाचे देवालय असेल. पण ते सूर्याचे देवालय असणे असंभवनीय आहे असा निर्णय डॉ. काणे यांनी काढला आहे.

## डॉ. काणे यांच्या आक्षेपांस उत्तरे

डॉ. काणे यांनी माझ्या कालप्रियनाथविषयक-मताच्या परीक्षणास आपल्या प्रस्तावनेची तब्बल अकरा पृष्ठे दिली आहेत. त्यांत अनेक ठिकाणी पुनरुक्ती व असंबद्ध विधाने आहेत. तथापि त्या अस्ताव्यस्त (rambling) विवेचनातून महत्त्वाचे मुद्दे काढून वर दिले आहेत. आता त्यांचे चिकित्सक परीक्षण करू.

## कालप्रियनाथ हे सूर्याचे देवालय होते

(१) **आक्षेप पहिला**– उज्जयिनीच्या महाकालाचे देवालय फार प्राचीन आहे. तेथे यात्रा भरत असे हे मान्य आहे. पण तेवढ्यावरून महाकाल आणि कालप्रियनाथ एक होत नाहीत.[१४] महाभारत व पुराणे धुंडाळल्यावर डॉ. काणे यांना 'कालपूजित' आणि 'कालनाथ' एवढीच कालशब्द असलेली शंकराची नांवे (किंवा विशेषणे) सापडली, 'कालप्रियनाथ' काही सापडले नाही. तेव्हा त्यांनी 'कालप्रियनाथ' हे सूर्याचे नाव तरी कोठे येते असा प्रतिप्रश्न केला आहे. त्याचे उत्तर देणे सोपे आहे. भविष्य व वराह पुराणातून मागे उद्धृत केलेल्या श्लोकांवरून हे स्पष्ट दिसेल की भारतात सूर्याची तीन देवालये सुप्रसिद्ध होतीः– (१) पूर्वाचलावर किंवा पूर्वतीरावर–तेथे सूर्यदेवाचे सांनिध्य प्रातःकाळी असे; (२) कालप्रिय येथे– तेथे ते सानिध्य मध्याह्नी असे; आणि (३) पश्चिम पर्वतावर मूलस्थान येथे– तेथे ते अपराह्णी असे. काल-

१४. नव्या आवृत्तीत तर महाकालाचा पक्ष सोडून डॉ. काणे हे 'कालप्रियनाथ' हा पद्मपुरातील शंकर होय असे म्हणतात. यावरून त्यांच्या मताची अस्थिरता व्यक्त होते. तसेच महाकालासंबंधी त्यांचे सर्व विवेचन असंबद्ध ठरते. पद्मपूर येथील देवालयातील शिवमूर्तीला कालप्रियनाथ म्हणत याला मुळीच पुरावा नाही.



अनुक्रमणिका

प्रिय येथील देव म्हणून तेथील सूर्यदेवाला कालप्रियनाथ म्हणत. कालप्रिय याने काल्पीचा निर्देश होतो हे तृतीय इन्द्राच्या कन्नोजवरील स्वारीच्या वर्णनाचा श्लोक वर उद्धृत केला आहे त्यावरून आणि 'यो गाधिपुरस्य दक्षिणः स कालप्रियस्योत्तरः' या काव्यमीमांसेतील राजशेखराच्या विधानावरून स्पष्ट आहे. तेथे एक-विशाल देवालय होते हे इन्द्राच्या स्वारीच्या वर्णना-वरून आणि ते देवालय सूर्याचे होते हे भविष्य व वराह पुराणातील उल्लेखांवरून सिद्ध होते.

'कालप्रियनाथ' यातील वैशिष्ट्यपूर्ण भाग कोणता ? 'कालनाथ' किंवा कालप्रिय ? हे वाचकानी ठरवून त्यावरून त्यांनी या वादासंबंधी आपले मत ठरवावे.

## भविष्यपुराण भवभूतीनंतरचे नाही

**आक्षेप दुसरा** – एखादा साक्षीदार आपल्या अशीलाच्या विरुद्ध जाऊ लागला म्हणजे तो त्या विशिष्ट घटनेच्या वेळी उपस्थितच नव्हता असा आक्षेप घेऊन त्याची साक्ष खोटी ठरविण्याचा प्रयत्न वकील करीत असतात. वराह पुराणावरून कालप्रिय येथे सूर्यदेवाचे सुप्रसिद्ध देवालय होते आणि तेथे त्या देवाचे सांन्निध्य मध्याह्नी असते अशी लोकांची श्रद्धा होती असे स्पष्ट होत असल्याने ते पुराणच भव-भूतीच्या नंतरचे असे ठरविण्याचा प्रयत्न डॉ. काणे यांनी केला आहे, पण तो साधला नाही. प्रथम त्यांनी 'सुतीरे' याच्याबद्दल 'मुंडीरे' असा आपल्याला सोईचा असा पाठ घेऊन ते मुंडीर म्हणजे गुजराथेतील मोढेर असा तर्क केला. तेथील सूर्याचे देवालय इ.स.च्या अकराव्या शतकात बांधले. म्हणून वराहपुराण भवभूतीनंतर कित्येक शतकांनी रचले असे अनुमान करून त्याचे प्रामाण्य उडविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. पण तो टिकत नाही. 'मुंडीरे' असा पाठ घेतला तरी वराहपुराणातील वर्णन गुजराथेतील सूर्याच्या देवाल-याला अनुलक्षून असणे शक्य नाही. कारण मुंडीर येथील देवालय भारताच्या पूर्व दिशेस होते असे त्या पुराणातील वर्णनावरून दिसते. मोढेर पूर्व भारतात नाही.

यानंतर वराहपुराण भविष्यपुराणानंतरचे असे त्यातील एका उल्लेखावरून सिद्ध करण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे. त्यांनी उद्धृत केलेल्या 'भविष्य-मिति विख्यातं ख्यातं कृत्वा पुनर्नवम् ।' या पादाचा संबंध 'साम्बः सूर्यप्रतिष्ठां च कारयामास तत्त्ववित्' या पुढील पादाशी नाही तर त्यामागील श्लोक 'साम्बस्तु सह सूर्येण रथस्थेन दिवानिशम् । रविं पप्रच्छ धर्मात्मा पुराणं सूर्यभाषितम् ॥ याच्याशी आहे. वराह पुराण भविष्यपुराणानंतर रचले गेले असे मानले तरी ते भवभूतीनंतरचे, हे कसे सिद्ध होते ? डॉ. काणे यांनीच इतरत्र म्हटल्याप्रमाणे पुराणातील विविध भागाचा काल ठरविणे शक्य नाही. भविष्यपुराण हे सर्वपुराणात पहिले मानले जाते. अर्थात् त्यातही पुष्कळ भाग मागाहून घुसडला गेला असावा. असो.

वराहपुराण भविष्यपुराणानंतरचे म्हणून त्यातील कालप्रियनाथाचा उल्लेख नंतरचा असे क्षणभर मानले तरी खुद्द भविष्यपुराणातील खालील श्लोकात काल-प्रियाचा उल्लेख येतो त्याची वाट काय ?

सांनिध्यं मम पूर्वाह्णे सुतीरे द्रक्ष्यते जनः ।
कालप्रिये च मध्याह्नेऽपराह्णे चात्रनित्यशः ॥

तेव्हा काही झाले तरी कालप्रिय डॉ. काण्यांचा पिच्छा सोडत नाही.

भविष्यपुराणही भवभूतिनंतर दीर्घकालानंतर रचले असे मानले तरी खंबायतच्या ताम्रपटातील (सन ९३०) व राजशेखराच्या (दहावे शतक) काव्य-मीमांसेतील कालप्रियाचे उल्लेख शिल्लक राहतातच. कालप्रियनगर भवभूतीनंतर अस्तित्वात आले आणि शंभरदीडशे वर्षांच्या आत सर्व भारतभर सूर्यदेवाचे पवित्रस्थान म्हणून प्रसिद्ध झाले याविषयी निश्चित पुरावा आहे काय ?

## कोणार्क देवालयाचे स्थान प्राचीन

**आक्षेप तिसरा**– कोणार्क येथील सध्याचे देवालय सांबाने बांधले असे मी कोठेही म्हटले नाही. ते देवालय गंगनृपती नरसिंह देव याने तेराव्या शतकात बांधले असेच मी आपल्या लेखात स्पष्ट म्हटले आहे. (संशोधनमुक्तावलि; सर १, पृ. १००; स्टडीज़ इन इंडॉलॉजी, भाग १, पृ ३९) सूर्याचे एक देवालय पूर्वभारतात समुद्रतीरी (सुतीरे) होते असे वर्णन पुराणात असल्यामुळे कोणार्क येथील सध्याचे देवालय पवित्र अशा पुरातनस्थली बांधले असावे एवढेच अनुमान








केले आहे. यासंबंधी एका तज्ञाचे मत उद्धृत करतो. डॉ. आर. सी. हझरा यांचा पुराणांचा अभ्यास दांडगा आहे. त्यानी महापुराणे आणि उपपुराणे यावर चिकित्सक दृष्टीने लिहिलेले ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. त्यांचे याविषयीचे मत पाहा— 'Sutira (literally meaning 'beautiful shore') must be another name for Mundira, which, again, must be very close to, or even identical with, Konarka situated on the seashore very close to the river chandrabhaga (a branch of the river Prachi in Orissa.) [Studies in the Upapuranas, p. 105]

[सुतीर (सुन्दर तीर) हे मुंडीर याचे दुसरे नाव असावे आणि ते ओरिसातील प्राची नदीला मिळणाऱ्या चंद्रभागानदीजवळ समुद्रतीरी असलेल्या कोणार्काच्या अगदी जवळ असावे किंवा तेच ते असेल.]

पूर्वदिशेच्या सूर्यदेवाच्या देवळाच्या निश्चित स्थलाचा संबंध भवभूतीच्या कालप्रियनाथाशी साक्षात् येत नाही. तेव्हा ही सर्व टीका एका दृष्टीने अप्रस्तुत आहे.

### भवभूती उत्तरभारतात दीर्घकाल होता

**आक्षेप चौथा**— भवभूती कालप्रिय (काल्पी) येथे दीर्घकाल राहिला असे मानण्यास आधार नाही, असे डॉ. काणे म्हणतात. उत्तररामचरिताच्या पूर्वीच्या आवृत्तीत कालप्रियनाथ म्हणजे उज्जयिनीचा महाकाल असे ते मानत होते. (आता त्यांनी आपले मत बदलले आहे.) भवभूती उज्जयिनीला तरी दीर्घकाल राहिला. याविषयी डॉ. काणे यांच्याजवळ पुरावा आहे काय? असे आक्षेप न घेणेच बरे. तथापि ते घेतल्यास उत्तर देणे कठीण नाही. भवभूती ग्वाल्हेर संस्थानांतील पद्मावती (पदमपवाया) येथे पुष्कळ काळ राहिला असावा. त्या नगरीचे आणि तिच्या आसपासच्या प्रदेशाचे सूक्ष्म वर्णन त्याने आपल्या मालतीमाधवात केले आहे. तेथून कालप्रिय (काल्पी) फार दूर नाही.

भवभूती कन्नोजच्या यशोवर्म राजाच्या आश्रयास होता असे कल्हण सांगतो, पण त्यावर डॉ. काण्यांचा विश्वास नाही. त्याचे सयुक्तिक कारण त्यानी दिले नाही. भवभूती कन्नोजला राजदरबारी असता तर त्याने तेथेच आपली नाटके करविली असती असे डॉ. काणे म्हणतात. पण भवभूतीला राजाश्रय अगदी शेवटी शेवटी-कालप्रियनाथ (काल्पी) येथे त्याच्या नाटकांची प्रशंसा झाल्यावर-मिळाला असेल. कदाचित् राजाश्रय असताही कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगी विशाल जनसमूहापुढे आपली नाटके यावीत असे त्याला वाटले असेल. पण हे सर्व तर्कच आहेत. भवभूतीच्या जीवनचरित्राविषयी आपणास फारशी माहिती नसल्यामुळे त्यातील कोणता तर्क सुप्रतिष्ठित आहे हे सांगणे शक्य नाही.

**आक्षेप पाचवा**— कालप्रियनाथ हे सूर्य देवाचे नाव असल्यास त्याची पुराणातील इतर नावे 'नाथ' पदान्त का नाहीत असा आक्षेप डॉ. काणे यांनी घेतला आहे. तो पोकळ आहे. शंकराची नावे सामान्यतः 'ईश्वर' पदान्त असतात. कालप्रियनाथ हे शंकराचे नाव असल्यास ते 'ईश्वर' पदान्त का नाही असा प्रतिप्रश्न त्यांस करता येईल.

### कालप्रियनाथ म्हणजे काल्पी येथील सूर्यदेव

**आक्षेप सहावा**— राजशेखराच्या काव्यमीमांसेतील 'यो गाधिपुरस्य दक्षिणः स कालप्रियस्योत्तरः।' यावरून कालप्रिय हे कन्नोजच्या दक्षिणेस शहर होते एवढेच सिद्ध होईल. तेथे सूर्याचे देवालय हे सिद्ध होत नाही असे डॉ. काणे म्हणतात. पण तृतीय इन्द्राच्या स्वारीच्या वर्णनावरून कालप्रियाचे देवालय यमुनेच्या काठी दक्षिणेस होते हे पष्ट आहे. पुराणातील 'यमुनायाश्च दक्षिणे मध्ये कालप्रियं देवम्' यावरून ते देवालय सूर्याचेच होते हे सूर्य-प्रकाशाइतके स्पष्ट आहे. वरील उताऱ्यात काल-प्रियाला देव म्हटले आहे. तसाच उल्लेख पुढील श्लोकात 'मूलस्थानं ततः पश्चादस्तमानाचले रविम्' असा केला आहे. या दोन्ही ठिकाणी 'कालप्रिय येथील देव' आणि 'मूलस्थान येथील देव' असाच अर्थ विवक्षित आहे.

साम्बाने चंद्रभागातीरी मूलस्थान येथे सूर्याचे देवालय प्रथम स्थापिले. नंतर त्यानेच सुतीर (किंवा मुंडीर) व कालप्रिय येथे सूर्याची देवालये बांधली असे भविष्य व वराह पुराणात म्हटले आहे. अशा प्रकारची सांप्रदायिक समजूत त्याकाळी होती हे उघड आहे.



अनुक्रमणिका






मूलस्थानचे सूर्याचे देवालय चिनी यात्रेकरू ह्यूएन-त्संग याने वर्णिले आहे. 'मूलस्थान' या देवळाच्या नावावरून इतरत्रही सूर्याची स्थाने त्याकाळी होती हे अनुमान करता येते. सूर्यदेवाची पूजा भारतात सातव्या शतकात व त्यापूर्वीही प्रचलित होती. बाणाने हर्षाचा पिता प्रभाकरवर्धन याच्या सूर्यपूजेचे वर्णन 'हर्षचरिता'त केले आहे. हर्षाच्या ताम्रपटात प्रभाकरवर्धनाचा पिता आदित्यवर्धन आणि पितामह राज्यवर्धन हेही परमादित्यभक्त होते असे म्हटले आहे. या सर्व पुराव्यावरून सातव्या शतकात मूलस्थानाबरोबर तितकीच पवित्र गणलेली सूर्यदेवाची स्थाने कालप्रिय व सुतीर येथे होती असेच अनुमान कोणीही निराग्रही मनुष्य काढील. अर्थात् कालप्रिय येथील देवालय भवभूतीच्या पूर्वी निदान दीडशे वर्षे सुप्रसिद्धच होते असे दिसते.

'उदयाचले' आणि 'अस्तमानाचले' यांनी पूर्व दिशेस आणि पश्चिम दिशेस एवढाच अर्थ पुराणातील उताऱ्यात विवक्षित आहे. कोणार्कचे स्थान पर्वतावर नाही तर मूलस्थान (मूलतान) हे तरी पर्वतावर वसले आहे काय ? अशा आक्षेपात तथ्य नाही.

**प्रश्न तिसरा–**

**भवभूती आणि उम्बेक हे एक किंवा भिन्न ?**

या प्रश्नावरही विद्वानांनी भिन्नभिन्न मते प्रदर्शित केली होती. सुमारे पाऊणशे वर्षांपूर्वी कै. शंकर पांडुरंग पंडित यांनी वाक्पतिराजाच्या 'गउडवहो' (गौडवध) या प्राकृत काव्याला जोडलेल्या प्रस्तावनेत भवभूती आणि उम्बेक हे एक होत या मताला उपोद्बलक असा पुरावा पुढे मांडला. 'मालतीमाधवा'-च्या सुमारे पाचशे वर्षे जुन्या असलेल्या एका हस्तलिखितात सहाव्या अंकाच्या शेवटी उम्बेकाचार्याचे नाव नाटककार म्हणून दिले आहे. त्या ठिकाणी उम्बेकाचार्याला 'श्रीकुमारिलस्वामिप्रसादप्राप्तवाग्वैभव' (ज्याला श्रीकुमारिलस्वामीच्या प्रसादाने वाग्वैभव प्राप्त झाले आहे असा) म्हटले आहे. त्याच हस्तलिखितात तिसऱ्या अंकाच्या शेवटी ते नाटक भट्टकुमारिलाच्या शिष्याने रचले असा उल्लेख आहे. आणि दहाव्या अंकाच्या शेवटी ते नाटक भवभूतीने केले असा निर्देश आहे. त्यावरून भवभूती व उम्बेक हे एकच असे अनुमान कै. पंडितानी केले. डॉ. रामकृष्णपंत भांडारकरांना हे उल्लेख कुतूहलोत्पादक वाटले, पण त्यांची चर्चा त्यांनी 'मालतीमाधवा'च्या प्रस्तावनेत केली नाही; कारण ती करण्यास जरूर ते साहित्य तेव्हा उपलब्ध नव्हते. त्यानंतर आता अनेक ग्रंथ प्रसिद्ध होऊन या प्रश्नाची चर्चा करणे शक्य झाले आहे. त्या साहित्याचा अभ्यास केल्यावर विद्वानात दोन तट पडले. म. म. कुप्पूस्वामी शास्त्री, गंगानाथ झा, आणि पां. वा. काणे त्यांच्या मते भवभूती आणि उम्बेक हे एक होत आणि उम्बेक हा कुमारिलाचा शिष्य होता. याच्या उलट डॉ. श्री. कृ. बेलवलकर यास हे ऐक्य शक्य वाटत नाही. डॉ. कुन्हनराजा यांचे मत डळमळीत होते.

उपलब्ध झालेल्या सर्व साहित्याचा अभ्यास करून मी पुढील निर्णय काढले होते. आणि ते प्रथम महाराष्ट्र साहित्य पत्रिका, वर्ष ३१, अंक १२० मध्ये आणि नंतर संशोधनमुक्तावलि, सर ३, पृ. ४३–६१ तसेच स्टडीज् इन् इंडोलॉजी, भाग १, पृ. ४३–५३ मध्ये प्रकाशित केले–

(१) उम्बेक हा कुमारिल भट्टांचा शिष्य नसून त्या दोघामध्ये बराच काळ गेला होता.

(२) उम्बेक हा इ. स. ७७५ ते ८०० या कालात होऊन गेला.

(३) भवभूती हा इ. स. ७०० च्या सुमारास होऊन गेला. तेव्हा तो व उम्बेक एक असणे शक्य नाही. त्यांचे ऐक्य सिद्ध करण्याकरिता मांडलेली सर्व प्रमाणे निर्बल आहेत.

भवभूती स्वतःच्या ग्रंथांत आपले उम्बेक असे नांव देत नाही, तसेच उम्बेकही आपल्या टीकांत कोठेही आपला भवभूती नावाने निर्देश करीत नाही. इतरांचा पुरावा या बाबतीत काय कामाचा ?

हा पुरावा मुख्यतः ५०० वर्षे जुन्या असलेल्या हस्तलिखितातील पुष्पिकां (Colophons) चा जे डॉ. काणे भवभूतिनंतर सुमारे ४०० वर्षांनी होऊन गेलेल्या कल्हणाच्या पूर्वोक्त विधानावर विश्वास ठेवत नाहीत तेच त्या कवीनंतर सुमारे ७०० वर्षांनी लिहिलेल्या हस्तलिखितातील भवभूति-उम्बेक यांच्या ऐक्यविषयक मतावर पूर्ण विश्वास ठेवतात हे पाहून मौज वाटते.










भवभूती आणि उम्बेक हे भिन्नकाळी होऊन गेले एवढेच नाही, तर त्यांच्या नावाकडे जरी पाहिले तरी ते एक होते असे कोणी म्हणणार नाही. भवभूती हा विदर्भांतील ब्राह्मण होता. त्याच्या पूर्वजांचे मूळ गाव उदुंबर हे अद्यापि वऱ्हाडात उमरखेड या नावाने प्रसिद्ध आहे. भवभूतीचे घराणे तेथील अशी समजूत तेथे अद्यापि प्रचलित आहे असे समजते. त्याच्या पूर्वजांची महाकवी, गोपाळ, नीलकंठ ही नावे तत्कालीन महाराष्ट्रीय ब्राह्मणांच्या नावासारखी आहेत. याच्या उलट उम्बेक हे नाव द्राविड देशातील आहे हे स्पष्ट दिसते. या नावातील भिन्नतेवरून भवभूती आणि उम्बेक हे भिन्न होत असाच निर्णय कोणीही काढील.

डॉ. काणे यांनी आमच्या मतावर पुढील आक्षेप घेतले आहेत--

(१) प्रा. मिराशी उम्बेक हा इ. स. ७७५ ते ८०० या सुमारास होऊन गेला असे मानतात. पण प्राचीन किंवा मध्ययुगीन कालातील ग्रंथकर्त्यांचे काल हे अस्थिर असतात. उम्बेक इ. स. ७५० च्या सुमारास झाला असणे शक्य आहे. तो कुमारिलाचा शिष्य होता. भवभूती आठव्या शतकाच्या पहिल्या पादात होऊन गेला. तो त्या शतकाच्या दुसऱ्या पादांतही आणखी काही वर्षे असावा. तो सन ६८० च्या सुमारास जन्मला असल्यास त्याने आपल्या म्हातारपणात इ. स. ७५० किंवा ७६० यावर्षी (उम्बेकाच्या नांवावर मोडणारे) मीमांसाविषयक ग्रंथ लिहिले असणे अशक्य नाही. एखाद्या ग्रंथकाराचे ग्रंथकर्तृत्व ५० किंवा ६० वर्षे चालणे शक्य असते. आमचीच गोष्ट घ्याना. आमची साहित्यदर्पणाची आवृत्ती आम्ही ३० वर्षांचे असताना सन १९१० मध्ये प्रसिद्ध झाली आणि आमचा हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र हा ग्रंथ आता १९६२ मध्ये पूर्ण होत आहे.

(२) उम्बेक हे नांव संस्कृतोद्भव नाही. पण एवढ्या एका कारणाकरिता उम्बेक व भवभूती हे भिन्न मानणे योग्य होणार नाही. उम्बेक हे नांव उमा शब्दापासून निघाले असावे. उमा याचे पालि भाषेत उम्म आणि दक्षिणभारतातील भाषात उम्बो असे झाले असावे. उम्बापासून औम्बेय आणि औम्बेयक असे शब्द बनले असावे. (उम्बायाः अयम् इति औम्बेयकः ।) भवभूतीच्या मातेचे नाव उमा असावे.

भवभूती द्राविड भूमीशी आणि तेथील वाक्प्रचाराशी परिचित होता हे उत्तररामचरिताचा टीकाकार घनश्याम याने दाखविले आहे. त्या नाटकाच्या दुसऱ्या अंकात लक्ष्मणाचा पुत्र चन्द्रकेतु हा अश्वमेधाच्या अश्वाचे रक्षण करीत असल्याचे ऐकून वासंती उद्गारते, ‘ हन्त, मातर्जीवामि । ’ असे उद्गार द्राविड स्त्रिया काढतात असे घनश्याम सांगतो.

भवभूतीने नाटके लिहून झाल्यावर पूर्वमीमांसेचा अभ्यास करून काही मीमांसा ग्रंथांवर टीका लिहिल्या असाव्या आणि नंतर त्याला दक्षिण भारतीय ग्रंथकारांकडून उंबेक असे नामाभिधान प्राप्त झाले असावे. पूर्वमीमांसेचे अध्ययन खिस्तोत्तर सहाव्या शतकानंतर दक्षिणेतच--विशेषतः केरलात--होत असे. भवभूतीला केरल देश परिचित होता याचे एक गमक मालतीमाधवाच्या तिसऱ्या अंकांत सापडते. लवङ्गिकेने. कामविह्वल माधवाच्या वर्णनात[१५] कृतककोपाने ज्यांचे कपोल रक्तवर्ण झाले आहेत अशा केरलसुन्दरींचा उल्लेख केला आहे त्यावरून भवभूतीला केरल देश परिचित होता व तेथे त्याने पूर्वमीमांसेचे अध्ययन आपल्या वार्धक्यात केले असे दिसते.

## डॉ. काणे यांच्या आक्षेपास उत्तरे

डॉ. काणे यांचे आक्षेप व स्पष्टीकरणे शक्य तो त्यांच्या शब्दात दिली आहेत. ती सर्व तर्कात्मक आहेत. त्यांना काडीचाही आधार नाही. डॉ. काणे यांनी अन्य संदर्भात काव्यमीमांसा ग्रंथावर टीपा लिहिणाऱ्याच्या बाबतीत जे उद्गार काढले आहेत ते त्यांच्या स्वतःच्या वरील संशोधनास लागू पडतात काय हे विचारी वाचकांनी ठरवावे– “ This is an example of how research becomes vitiated by conjectures and carelessness. People make conjectures, often assume what is to be proved by independent evidence and do not see that they are arguing in a circle. ” ( तर्क आणि निष्काळजीपणा यांच्या योगाने संशोधन कसे दूषित होते याचे हे उदाहरण आहे. लोक तर्क

१५. हे वर्णन माधवाचे नाही, मालतीचे आहे.












करतात, जे स्वतंत्र पुराव्याने सिद्ध करावयास पाहिजे तेच गृहीत धरतात आणि आपण तर्काच्या चक्रकापत्तीत सापडलो आहो हे लक्षात घेत नाहीत.)

भवभूती आणि उम्बेक एक का, तर भवभूतीला उंबेक (औंबेयक) हे नाव त्याच्या उंबानामक मातेवरून मिळाले होते म्हणून; आणि भवभूतीच्या मातेचे नाव उम्बा कशावरून, तर त्याचे उम्बेक हे दुसरे नाव होते म्हणून. यांतील चक्रकापत्ति कोणाच्याही लक्षात यावी इतकी स्पष्ट आहे.

आता डॉ. काणे यांच्या आक्षेपांचे थोडक्यात परीक्षण करू.

## उम्बेक भवभूतीनंतर काही काळाने होऊन गेला

**आक्षेप पहिला–** डॉ. काणे यांच्या मते कुमारिल सन ६५० ते ७०० या कालात होऊन गेला. उम्बेकाच्या कुमारिलकृत 'श्लोकवार्तिक' आणि मण्डनमिश्रकृत 'भावनाविवेक' या ग्रंथांवरील टीकांतील उल्लेखांवरून तो त्या दोघानंतर बऱ्याच काळाने होऊन गेला असे दिसते. (विस्तृत विवेचनाकरिता संशोधनमुक्तावलि, सर ३, पृ. ४९–५० पाहा.) अर्थातच तो कुमारिलाचा शिष्य होणे शक्य नाही. आणि त्याचा काळ सन ७०० ते ७५० हा मानणेही शक्य नाही. उत्तररामचरिताच्या तिसऱ्या आवृत्तीत डॉ. काणे 'भवभूती इ. स. च्या आठव्या शतकाच्या पहिल्या पादात होऊन गेला असे म्हणत होते. आता तो त्या शतकाच्या दुसऱ्या पादांतही होता असे म्हणतात. आणि त्या योगे त्याचे उम्बेकाशी ऐक्य साधू पाहतात. यात जे सिद्ध करावयाचे तेच गृहीत धरल्यासारखे (begging the question) होते. अन्य प्रमाणांनी भवभूती व उम्बेक यांचे ऐक्य सिद्ध होत असते तर डॉ. यांच्याप्रमाणे भवभूतिही दीर्घायुषी होता असे मानता आले, असते. पण तसा स्वतंत्र पुरावा उपलब्ध नाही.

## भवभूती द्राविड देशात राहिला नव्हता

**आक्षेप दुसरा—** भवभूती कधीकाळी दक्षिणभारतात-केरळसारख्या दूरप्रांतात-मीमांसेच्या अध्ययनाकरिता गेला होता याला काडीचाही आधार नाही. त्याचे पूर्वज वेदविद्येचे पारंगत पंडित होते. तो स्वतः 'पदवाक्यप्रमाणज्ञ' होता. तेव्हा त्याला पूर्वमीमांसेच्या अध्ययनाकरिता केरलसारख्या दूरदेशी जाण्याची मुळीच आवश्यकता नव्हती. म्हणून दक्षिण देशात राहिल्यामुळे त्याला उम्बेयक हे नाव पडले हे अनुमान बिनबुडाचे ठरते. केरलसुंदरीच्या कृतककोपमूलक रक्तवर्ण कपोलांवर आधारलेले त्याचे केरलदेशगामित्व तर हास्यास्पद आहे. ते अनुमान खरे मानले तर भवभूती 'मालतीमाधव' नाटक रचण्यापूर्वीच केरल देशात जाऊन राहिला होता असे मानावे लागेल. राजशेखर अनेक देशांच्या युवतीचे वर्णन करतो. तो काय त्या सर्व देशात जाऊन राहिला होता?

'हन्त, मातर्जीवामि' या उद्गारावरून घनश्याम टीकाकाराने केलेले भवभूतीच्या द्राविडत्वासंबंधी अनुमान तर बालिश आहे. हाच तो घनश्याम नव्हे काय ज्याने कालिदास, ईश्वरकृष्ण आणि भर्तृमीढ यांचे ऐक्य प्रतिपादून डॉ. माईणकरांसारख्या विद्वानाला चकविले होते? त्याच्या विधानावर किती विश्वास ठेवावा हे वाचकांनी ठरवावे.

तर मग भवभूती आणि उम्बेक यांचे जे ऐक्य पूर्वोक्त मालतीमाधवाच्या हस्तलिखितात गृहीत धरले आहे याची उपपत्ती कशी लावावयाची? या प्रश्नाचे उत्तर मी संशोधनमुक्तावलि, सर ३, पृ. ६० वर दिले आहे. या समजाचे कारण एकच– ते म्हणजे 'ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञाम्' इत्यादि श्लोक. हा श्लोक भवभूतीने 'मालतीमाधवा'त स्वतःचा वृत्तांत देताना घातला आहे हे टीकाकारांना माहीत होते. तोच श्लोक 'श्लोकवार्तिका'वरील उम्बेकाच्या टीकेच्या आरंभी दिसल्यावर भवभूती व उम्बेक एकच असा समज टीकाकारांचा झाला असावा. पण भवभूती आणि उम्बेक यांच्या कालातील अंतर आणि त्यांची भिन्न पद्धतीची नावे यावरून ते भिन्न होते यांत संशय नाही.

येथवर गुरुवर्य काणे यांनी माझ्या भवभूतिविषयक विविध प्रश्नांसंबंधी मतांवर केलेल्या टीकेचा परामर्श घेतला. डॉ. काणे यांची गाढ विद्वत्ता आणि दीर्घ परिश्रम याबद्दल मला नितांत आदर आहे. वर जी त्यांच्या आक्षेपांना उत्तरे दिली त्यात सत्यान्वेषणाखेरीज दुसरा हेतू नाही. त्यांनीही याच दृष्टीने त्यांकडे पाहावे अशी त्यांस सविनय विनंती करून लेखणीला विराम देतो.



अनुक्रमणिका






श्री. वि. वि. कानोले

# नामा पाठकाचे अज्ञात व रसाळ काव्य–
# "सीतास्वयंवर"

महाराष्ट्र सारस्वतात ज्या काही कवींची जीवन-चरित्रविषयक माहिती अज्ञात आहे त्यातच नामा पाठकाचा समावेश होतो. कान्हो पाठक हा नामा पाठकाचा आजा व वडवाळसिद्ध नागेशाचा शिष्य समजला जातो. वडवाळसिद्ध नागेशावरून कान्हो पाठकाचा व कान्हो पाठकावरून नामा पाठकाचा काल चौदावे शतक गृहीत धरला जातो. त्याचप्रमाणे एकनाथाच्या संतमालेत नामा पाठकाचा उल्लेख असल्यामुळे परंपरा त्यास एकनाथपूर्वकालीन मानते. अलीकडेच डॉ. वसंत पारखे[1] यांनी नामा पाठकाच्या "द्रौपदीवस्त्रहरण" काव्याचा परिचय करून देत असताना संतमालेतील हा अभंग प्रक्षिप्त असण्याची शक्यता व्यक्त केली आहे; व नामा पाठकाचा काल पंधरावे शतक ग्राह्य धरला आहे.

नामा पाठकाच्या नावावर अश्वमेध, नामरत्न-माला, भरतभेट, चंद्रहास्यकथा, द्रौपदीवस्त्रहरण, सुदामचरित्र, कालियाची कथा, व इतर स्फुट रचना एवढा काव्यसंभार आहे. परंतु या विपुल संभारात नामा पाठकाने स्वचरित्रविषयक माहिती कुठेच दिलेली नाही.

### काव्य परिचय

त्याच्या उपरोक्त काव्यसंभारात 'सीतास्वयंवर' या नवीन व रसाळ काव्याची भर पडत आहे. या काव्याची नोंद कुठेही आढळत नाही. प्रस्तुत काव्याचा अंतर्भाव असणारे एक बाड नांदेडच्या गोदातीर संशोधन मंडळाचे चालक श्री. वि. अं. कानोले यांना नांदेड जिल्ह्यातील 'तामसा' येथे श्री. नाथागुरु मुगूटकर यांचेकडून प्राप्त झाले. या आख्यानात एकूण दहा प्रसंग आहेत. काव्यग्रंथातील एकूण ओवीसंख्या (९४०) आहे. प्रत्येक प्रसंगाच्या अंती ग्रंथकर्त्याचा नामोल्लेख आढळतो.

कवना न सांगे गुह्ये गोष्टि। गुप्त ठेविली निजपोटि
नामा पाठक ह्मने उठाउठि। होईल भेटी श्रीरामा
–प्र. ३ ॥४३॥

यैसी सीतेची सैंवर कथा। प्रीती पावो श्रीरघुनाथा
कथा पावली समाप्ता। ह्मने नामा पाठकु॥
–प्र. १० ॥४४॥

प्रतलेखकाने ग्रंथाच्या शेवटी "हस्ताक्षर कृष्णाजी शाम हाली मुकाम कसबे कंधार" असा शेरा दिला असून प्रतलेखनकाल सन ११६५ हिजरी नोंदविला आहे.

काव्याचा प्रारंभ सीतेच्या जन्मकथेपासून होतो व शेवट श्रीराम जानकीचा विवाहोत्तर अयोध्या प्रवेश व तेथील लोकांच्याकडून झालेले अपूर्व स्वागत या ठिकाणी होतो.

### भावार्थ रामायण व सीतास्वयंवर

एकनाथांनी भावार्थ रामायणातील बालकांडात सीतास्वयंवराची कथा सविस्तर वर्णन केली आहे. एकनाथाच्या व नामा पाठकाच्या कथेत बऱ्याच अंशी साम्य आहे. बालकांडाचा शेवटचा अध्याय व सीतास्वयंवराचा शेवटचा प्रसंग नेमका त्याच ठिकाणी संपतो. बालकांडातील अध्याय व सीता-स्वयंवरातील प्रसंग यात सर्वत्रच क्रमवार संगती नाही. नामा पाठकाने आपल्या सोयीप्रमाणे कथाप्रसंग वेचले आहेत. व कित्येक ठिकाणी फेरबदल व स्वतंत्र रचनाही केलेली आहे. या दोनही आख्यानात कित्येक ठिकाणी विलक्षण व हुबेहूब साम्य आढळते.

एकनाथ– तू रामासी म्हणसी बाळ॥
हे मूर्ख बुद्धि अतिस्थूळ
श्रीराम अवतार निर्मळ॥
जाण केवळ सुरसाह्य –(अ. ८।५७)

---

१. "नामा पाठककृत द्रौपदीवस्त्रहरणाख्यान" भा. इ. सं. मंडळ त्रैमासिक व. ४३ अं. १–४

नामा पाठक–त्यास ह्मनसी तु बाळक ॥
तरी हा कृदांत काळाचा काळ
तु नेनेसी केवळ मूर्ख ॥
रामपूर्व अवतारी (प्र. ४।६८)
एकनाथ–विदेहाची सीमा लक्षूनी ॥
पेटी निक्षेपूनी गेले (अ. १५।२४)
नामा पाठक–इसी निक्षेप करारे क्षिती ॥
वैदेह्याचे सीमेत (प्र. २।८५)
एकनाथ– अत्यंत सौंदर्याची शोभा ॥
चंद्रलोपे अंगप्रभा
देखोनि लावन्याचा गाभा ॥
विवेकाचा उभा प्राण जाय (अ. १४।२८)
नामा पाठक–राम लावन्याचा गाभा ॥
सीता केवळ दिव्ये प्रभा
मंडपासी आली शोभा ॥
पडली प्रभा सकळावरि (प्र. १०।५)
एकनाथ– घेवोनि चिद्रत्नांची माळा ॥
घाली गळा श्रीरामाच्या (अ. २०।९१)
नामा पाठक–मग घेवोनिया रत्नमाळा ॥
घातली श्रीरामाचे गळा (प्र. ७।३९)
एकनाथ– निशान भेरी मृदंग शंख ॥
ढौल चौडकी काहळा अनेक '(अ. २७।७)
नामा पाठक–निशान ध्वनी शंख भेरी ॥
देव दुदुंमी वाजिनल्या (प्र. ७।१०)
एकनाथ– सूक्ष्म सेवेच्या सेवया ॥
क्षीर साखरेची अळलिया (अ.२३।१०१)
नामा पाठक–सेवया सरवळी क्षिरी ॥
दुग्ध अळलिया शर्करावरी (प्र. ८।१६)
एकनाथ– वारंवार मुख्य न्याहरी ॥
हरीखे निंबलोण उतरी (अ. २४।६८)
नामा पाठक–देखोनि रामसीता रत्ने ॥
निवाले मन निंबलोणा (प्र. १०।३)

उपरोक्त यादी अजूनही वाढण्यासारखी आहे. अनेक पदार्थांची नावे, शब्द व वाक्प्रचार दोन्ही काव्यात नेमके तेच आहेत. काव्यांतर्गत कल्पना व वर्णन साम्य वरील उदाहरणांनी अगदी स्पष्ट होते. एकनाथाच्या भावार्थरामायणात व नामा पाठकाच्या प्रस्तुत सीतास्वयंवर या काव्यात असणारे हे विलक्षण साम्य नजरेआड करण्यासारखे नाही.

या साम्याचा विचार करताना दोन गोष्टी संभवतात. एकनाथांच्या डोळ्याखालून नामा पाठकाचे सीतास्वयंवर गेले असावे व त्यानी त्यातील कल्पना उचलल्या असाव्यात. किंवा दुसरी बाब म्हणजे नामा पाठकाच्या अवलोकनात भावार्थ रामायण आले असावे व त्याने बालकांडातील सीता स्वयंवराशी निगडित कथाभागाचा आधार घेऊन व प्रसंगी फेरबदल व स्वतंत्र रचना करून प्रस्तुत काव्य लिहिले असावे. या दोन बाबींपैकी शक्यता कोणती असावी हा प्रश्न पडतो. संपूर्ण रामायणाची रचना करणाऱ्या एकनाथासारख्या पंडित कवीस केवळ बालकांडातील काही कथाभाग वर्णन करण्यासाठी एका कवीच्या उपाख्यानाची गरज संभवते का? एकनाथाचा भर प्रामुख्याने मूळ रामायण, भारत, पुराणे, संस्कृत विदग्ध वाङ्मयावर अधिक होता. तेव्हा त्यांनी नामापाठकाच्या काव्याचा आधार घेतला असण्याची कमी शक्यता वाटते. या उलट नामापाठकाने भावार्थ रामायणातील कथाभाग व कल्पनांचा उपयोग आपल्या काव्यात करून घेतला असण्याची अधिक शक्यता वाटते. व ही बाब जर स्वीकृत व सिद्ध झाली तर नामा पाठक एकनाथोत्तर कालीन ठरेल. एकनाथी भागवत रामायणांचे नित्य पठण करणारा एकनाथ-भक्त म्हणून त्याचा संतमालेत समावेश झाला असण्याची शक्यता आहे. एकनाथोत्तर कालीन निंबराजाचा संतमालेत समावेश आहेच ना! कदाचित नामा हा एकनाथ, मुक्तेश्वर समकालीन असण्याचाही संभव आहे. कारण मुक्तेश्वर व नामा पाठकाच्या रचनेतही बरेचसे साम्य आहे. असे डॉ. पारखे यांनी[२] दाखवून दिले आहे. मुक्तेश्वरांनी नाथांचे भावार्थ रामायण पूर्ण केले ही बाब आता सर्वमान्य झाली आहे. तेव्हा मुक्तेश्वरांच्या अवलोकनात नाथांच्या बरोबरच नामा पाठकाचेही काव्य आले असावे व त्याने अनुकरण केले असावे असे वाटू लागते. या बाबतीत अधिक संशोधनाची गरज आहे.

२. भा. इ. सं. मंडळ त्रैमासिक व. ४३ "पृष्ठ ८४".








## सीतेची जन्मकथा

नामा पाठकाच्या 'सीतास्वयंवर' या अज्ञात काव्याचा मराठी वाचकास परिचय करून द्यावा हाच प्रस्तुत लेखाचा मूळ हेतू, परंतु तदनुषंगाने काही बाबी लक्षात आल्या व मनात विचार उद्भवले ते वर उद्धृत केले आहेत. नामा पाठकाच्या चरित्राविषयी जोपर्यंत निश्चित पुरावा उपलब्ध होत नाही तोपर्यंत केवळ अनुमानावरच विसंबून राहणे भाग आहे.

नामा पाठकाने पहिल्या दोन प्रसंगात सीतेची जन्मकथा सविस्तर वर्णन केली आहे. लक्ष्मी पद्माक्ष राजाच्या पोटी जन्म घेते. पद्माक्षाचा लढाईत वध होतो व कैलासाहून परतणाऱ्या रावणाची दृष्टी पद्माक्षीवर पडते, भीतीने ती यज्ञकुंडात उडी घेते. निराश रावण यज्ञकुंडातील रक्षा धुंडाळीत असता त्याला एक तेजस्वी रत्न गवसते . तो ते पेटीत बंद करून लंकेस आणतो. ही पेटी लंकेत आल्यावर रावणपत्नी मंदोदरीस आपले 'मंगळसूत्र' तुटल्याचे विलक्षण व अपशकुनी स्वप्न पडते. भावार्थ रामायणात बालकांडाच्या ७ व्या अध्यायात रामजन्माचे लंकेत जे अपशकून घडतात त्यावेळी मंदोदरीची "गळसरी" तुटून अग्नीत पडल्याचा उल्लेख आहे. नाथाच्या 'गळसरी'चे नामाने "मंगळसूत्र' केले आहे. मंदोदरी हे स्वप्न रावणास सांगते त्यावेळी त्यास अचानक पेटीची आठवण होते व तो ती उघडण्याचा प्रयत्न करतो, पण सर्व प्रयत्न फोल ठरतात.

मग कुलूप काढोनी उचलली पेटी ॥
तव कन्या देखिली द्रुष्टी
राजा रानी पाहे गोरटी ॥
अंगुष्ठ मुखी घातला असे ॥५७
काय वर्नावे श्वरूप ।
जैसा सुर्याचा प्रकाशदीप
कोंदन कनकाचे माप ॥
धन्ये प्रताप कर्त्याचा ॥५८॥
दचकली मंदोदरी ॥
हे वीघ्न आनीले लंकापुरी
द्रुष्ट स्वप्न आठवले आंतरी ॥
पूर्वी देखीले ते ॥ प्र. २ ॥५९॥

मंदोदरीच्या आग्रहास्तव पेटी विदेह्याच्या सीमेत पुरून टाकण्यात येते. तिसऱ्या प्रसंगात नामा पाठकाने जमीन नांगरताना जनकास झालेली कन्याप्राप्ती व तत्प्रीत्यर्थ झालेला मिथिलेतील सोहळा वर्णन केला आहे. चौथ्या प्रसंगात दशरथास झालेल्या पुत्र-प्राप्तीची कथा, रामचंद्राचे यज्ञसंकट निवारणासाठी विश्वामित्राबरोबर गमन व कार्यसमाप्तीनंतर मिथिलेस सीतास्वयंवरासाठी प्रयाण हा कथाभाग आला आहे. मिथिलेच्या मार्गावर असताना वाटेतच शिलारूपी अहिल्येचा उद्धार व त्या निमित्ताने अहिल्येची इत्थंभूत कथा पाचव्या प्रसंगात वर्णन केली आहे.

## स्वतंत्र प्रतिभाविलास

पुराणिक व कीर्तनकार आख्यान रंगविताना तत्कालीन सामाजिक चालीरीती, मानवी स्वभावातील विसंगती व व्यंगावर मार्मिक टीका करून कथेत विनोदनिर्मिती व रसाळपणा निर्माण करतात. नामा पाठक हा पुराणिकच असल्यामुळे अशाच प्रकारचा एक प्रयत्न येथे केला आहे. या प्रसंगास मूळरामायण किंवा भावार्थ रामायणाचा आधार मुळीच नाही. मिथिलेस जाताना रामविश्वामित्रांच्या समवेत ऋषिविप्रांचा मोठा मेळावा होता. त्यातील काही विप्रांनी जेव्हा रामचंद्रांच्या पदस्पर्शाने शिळेतून सुस्वरूप नारी प्रगट झालेली पाहिली तेव्हा—

देखीले अहिल्येचे उधरन ॥
ते पाशान घेतले संपुर्न
स्त्रीयेची इच्छा धरून ॥
वाहती वोझे मस्तकी ॥ –प्र. ४।७
पाशानाच्या होती नारी ॥
हे आपूर्व होय वनांतरी,
गुप्त न कळता बरोबरी ॥
चालती रुषीचे ॥८॥
संतोशले ब्राह्मण ॥
चालीले पाशान घेऊन,
लागताची राम चेरन ॥
होतील नारी ॥ –प्र. ५।१२२

उपरोक्त आशा बाळगून चालणाऱ्या शामभट, रामभट, हरभट व जीवभट या विप्रांची आपणास स्त्रीची कशी गरज व निकड आहे यासंबंधीची चर्चा अवश्य ऐकलीच पाहिजे.

येकमेका बोलती ।।
इच्छा पत्नीची घरीती,
घरी असोनी युवती ।
दुसरी का इच्छिता –प्र. ५।१२३
शामभट ह्मने दामभटासी ।
स्त्री आहे बरवंटा
पुत्र नव्हे साटवाटा ।।
यास्तव दुसरी पाहिजे ।।१२४।।
हरभट सीवभटासी ह्मनत ।।
माझी पत्नी माहेरी राहत ।
काही केल्या न ये येथ ।।
यास्तव पाहिजे स्त्रिया ।।१२५।।
धर्मभट गंगभटासी सांगत ।।
मज कन्या जाल्या सात,
काही केलिया नव्हे सुत ।।
यास्तव दुसरी नेतसे ।।१२६।।
जीवभट ह्मनत कूर्मभटाते ।।
गुन न येती पत्नीते,
आवगुन ह्मनून तजिले तिते ।।
करीन मागुते लग्न मी ।।१२७।।
येक ह्मने जाली माहातारी ।। यास्तव पाहीजे दुसरी
वये माझे तारुन्येषरी ।। व्रथा गवावू का ये
– प्र. ५।१२८।।

नागेशकृत 'सीतास्वयंवरात' उपरोक्त वर्णने आहेत. ही वर्णने नागेशानी नामा पाठकावरूनच घेतली असावीत असे वाटते.

## सीतास्वयंवर

मिथिला नगरीत राम-विश्वामित्राचे आगमन व स्वागत होते. जनकराजा सीतेचे स्वयंवर घोषित करतो व स्वयंवरात रावणासकट सर्व राजांची दारुण फजिती होते. इत्यादी कथाभाग कवीने सहाव्या प्रसंगात वर्णन केला आहे. रावणाच्या फजितीचे नामा पाठकाने केलेले आलंकारिक वर्णन मुक्तेश्वरी-पद्धतीचे वाटते–

करचरन आपटीत ।।
धनुशे बैसले जैसा पर्वत,
बहुत काकुलती करीत।।
लंकानाथ ते वेळी –प्र. ६।१०४
जैसे व्याघ्रे धरिली धेनू।।
मार्जेर मुशक वाहनू
आजगरा धरु सुपर्नू ।।
तैसा रावनु धनुशतळी ।।१०५।।
जैसा गजावरी पंचाननू ।।
तैसाची पाताळी रावनु,
पाहाती राजे संपूर्न
परी कृपा न ये कवनासी ।।१०६।।

–सर्व राजे व गर्विष्ठ रावण पराभूत झाल्यानंतर विश्वामित्र रामचंद्रास अनुज्ञा देतात व ती शिरसावंद्य मानून रघुनायक पुढे सरसावतो.

मग श्रीरामे काये केले ।।
वाम अंगुष्ठे धनुश उचलीले,
मग ते करीवो घेतले ।।
पुस्पा सारीखे पैं देखा प्र. ७।२८
श्रीरामे धनुशे उचलिले ।।
हे जानकीते श्रुत जाले,
परमानंद मन संतोशले ।।
येश दिधले त्रियेंबका ।।३८।।
मग घेउनिया रत्नमाळा ।।
घातली श्रीरामाचे गळा ।
तेथे जेयजेयकार जाला ।।
पुस्पी वरुशेला सुरेश्वरु ।। प्र. ७।३९।।

## अयोध्येचे वऱ्हाड

रामचंद्राने पण जिंकल्यामुळे प्रसन्न झालेला जनकराजा विश्वामित्रामार्फत दशरथास पत्र पाठवून मूळ धाडतो. दशरथ निरोप मिळताच प्रचंड लवा-जम्यासह आपले वऱ्हाड घेऊन मिथिलेकडे प्रयाण करतो हा कथाभाग सातव्या प्रसंगात घेतला आहे. या वऱ्हाड वऱ्हाडिणींचा व तिघी विहिणींचा थाट तर विचारूच नका –

वऱ्हाड निघाले अयोध्येबाहेरी ।।
मिरवत वाजंत्र्याचे गजरी ।
संतोशोनी अंतरी ।।
सहपरिवारे राजा निघे प्र. ७।७४।।
कौसल्ये माता गजावरी ।।
सिबिकेत कैकेयी दुसरी,
सुकासनी तिसरी ।।
सुमित्रा ते ।।७५।।



अनुक्रमणिका






मध्यभागी वऱ्हाडिनी ॥
सवे चालती विळासिनी,
सेवा करीती हडपीनी ॥
तीघी कामिनी राजांगना प्र. ७।७९

—पायी चाललेल्या वऱ्हाडिणींची कींव व थट्टेची लहर येऊन दशरथ राजा म्हणतो :

ह्मने जाने आहे दुरपंथा ॥
का गोवितां वऱ्हाडिनीसी प्र. ७।८१
हास्येमुखे राजा ह्मनत ॥
पायघडीया घाला येथ
वीहीनीचा जो पदार्थ ॥
तो मान गौरव येथेचि द्या रे ॥ ८२ ॥
त्या वीहीनीचा काय भर्वसा ॥
देते कीवा न देते वीळासा,
येथेचि पुरवा रे इछी आशा।
दुरदुराशा पै करा । प्र. ७।८३ ॥

## राम-सीता विवाह

नामा पाठकाने सातव्या प्रसंगात रामसीतेचा लग्नसोहळा तत्कालीन वैदिक पद्धतीनुसार इत्थंभूत वर्णन केला आहे. अयोध्येच्या वऱ्हाडाचे यथोचित स्वागत व त्यानंतर सीमांतपूजनादिक कार्यक्रम व लग्नसोहळा यथासांग पार पडतो. कवीने लग्नतिथीची सुद्धा नोंद दिली आहे :

वीभव नाम सवछर॥
कार्तिक कृष्ण पक्षी मनोहर,
आष्टमी दिन॥ श्रोमवार॥
लग्नघटिका नेमिली प्र. ७।१२५ ॥
मग वराची महापूजा।
करीता जाला जनक राजा
उदक घाली त्याची भार्या॥
कन्यादान करावया॥१२६॥
नाना वाद्ये वाजत॥
राम चालिले मिरवत,
परमानंदे मंडपात॥
आनिला रघुवीर ॥१२९॥
आंत्रपाट धरीला विप्री॥
आनीली सीतासुंदरी
वेदघोश विप्र मंत्री॥
मंडपी आनंदू ॥१३०॥

त्यासुमुहूर्त सुदिनी॥
लग्न लावीले मुनिजनी
मंगळ आष्टकाची ध्वनी॥
जाली ते वेळीं ॥१३३॥

सीते मस्तकी आक्षेता॥
श्रीराम जाला घालिता,
रघुनाथाचिया माथा॥
घाले आक्षता जानकी ॥१३४॥

ह्मनती आता सावधान॥
दोघासी लावीले लग्न
मग बांधिती कंकन॥
उभयतासी ॥१३५॥

## सुनमुख व विहिणी भोजन

कवीने आठव्या प्रसंगात सुनमुख पाहणे, हळदी लावणे, नावे घेणे, विहिणी भोजन इत्यादी प्रसंगांचे तपशीलवार वर्णन केले आहे. यावरून तत्कालीन रूढी, चालीरीती, खाद्यपदार्थ यांचे सम्यक् ज्ञान होते.

जाले श्रीरामाचे लग्न॥
सीतेने वरीला रघुनंदन,
कैकई कौसल्या सुमीत्रा जान॥
सुनमुख पाहती प्र. ८॥११॥

नावे घेववीती येकमेका॥
हाळदी लावती कौतुका,
नरनारी हासती देखा।
टकमका पाहाती दोघे ॥१२॥

—यानंतर भोजनाची वर्दी येते तेथील पंक्तीचा थाट बघा—

सुगंध सुपरिमळ भात॥
वाढीता परिमळ दरवळीत,
पुर्नपुरिया गुळवरिया समस्त॥
घारीपुरी साज वरी प्र. ८॥१४॥

कोरवडा सुरवडा॥
दधीमिश्रीत आंब्रवडा।
पापडा वनशाक क्षिरवडा॥
वाढिताती ॥१५॥

सेवया सरवळी क्षीरी ॥
पंच प्रकारच्या कुसरी ।
दुघ अळीलया शर्करावरी ॥
घातली अमुप ॥ प्र. ८ ॥१६॥

–पुरुष-पंक्तींच्या नंतर वरमाय व इतर विहिणींचे थाटाचें भोजन हास्यविनोदासह व आग्रहासह पार पडते.

लग्नवरात अयोध्येस परत जात असताना वाटेत रामपरशुरामाचे युद्ध होते हा कथाभाग ९ व्या प्रसंगात वर्णिला आहे. शेवटच्या व दहाव्या प्रसंगात अयोध्या-नगरीत वधुवरांचे आगमन व स्वागत, आतषबाजी, रोषणाई व लक्ष्मीपूजनादी कार्यक्रम व इतर सोहळ्यांचे वर्णन केले आहे.

### आलंकारिकता व वर्णनविशेष

नामा पाठकाचे प्रस्तुत काव्य अत्यंत प्रासादिक आहे. त्याची भाषा ओघवती असून त्यात शब्दा-वडंबर किंवा क्लिष्टतेचा मागमूस नाही. कवीस अलंकाराचा अतिहव्यास नाही पण काही ठिकाणची त्याची उपमा उत्प्रेक्षायुक्त वर्णने मनोहर व हृद्य आहेत. अयोध्या नगरवासियांना रामसीतेचा अनुरूप जोडा बघितला तेव्हा त्यांना –

जैसा सुर्यासवे तेज आसे ॥
कां कोंदनी मानीक जडले आसे ।
मुक्ताफळी हिरा दिसे ।
तैसे मासे रामसीता ॥४॥
की आम्रुताचि घडली ॥
की सुवर्नाची वोतीली ।
यैसी लावन्याची पुतळी ॥
प्राप्त झाली श्रीरामा ॥५॥
राम लावन्याचा गाभा ।
सीता केवळ दीव्ये प्रभा ।
मंडपासी आली शोभा ॥
पडली प्रभा सकळावरी ॥ प्र. १०।६॥

कवीची काही ठिकाणची निसर्गवर्णने मुक्तेश्वरी थाटाचीच वाटतात. अयोध्येचे वऱ्हाड मिथिलेस जात असताना त्यांना निरनिराळी उपवने आढळतात त्यापैकी एका वनात –

व्याघ्र सीहृचे जांवुक शुकर ॥
मृग रीस वानर
शार्धूळ आरी आजगर॥
आनी कुंजर मदोन्मत्त । प्र. ७।१०१
व्रक्षे दाटली घनदाटि ॥
तरुवर गगनासी सांगती गोष्टी
केळी नारेळी नीबोटी ॥
ताड माड व्रक्षे सकळ ॥१०२॥

एवंच नामा पाठकाचे प्रस्तुत काव्य मधुर, रसाळ व प्रासादिक आहे. या आख्यानाच्या निमित्ताने तत्कालीन सामाजिक चालीरीती व मानवी स्वभावाचे मार्मिक वर्णन कवीने केले आहे. प्रस्तुत लेखाच्या द्वारे नामा पाठकाच्या एका नवीन काव्याचा मराठी रसिकास परिचय होऊन त्याच्या काव्यसंभारात एका अधिक ग्रंथाची भर पडत आहे.

---





अनुक्रमणिका






प्रा. वसंत स. जोशी

# आद्य मराठी चरित्रकार : महेंद्रभट

## चरित्रे-जुनी व नवी

मराठीमध्ये अलीकडच्या काळात निर्माण झालेली चरित्रे व आत्मचरित्रे लक्षात घेतल्यास त्यात एक वाङमयप्रकार लिहिला जात असल्याची जाणीव दिसून येते. त्यात एक प्रकारचा नेटकेपणा आणि लालित्य येत चालले आहे. तो एक माहितीपर प्रबंध न होता एकाद्या ललित कलाकृतीचे स्वरूप त्याला येत चाललेले दिसते. अर्थात अशा चरित्र-आत्मचरित्रांचे आकर्षण त्या वर्ण्यभूत व्यक्तीप्रमाणेच लेखकाच्या रसाळ व चटकदार शैलीनेही निर्माण होऊ शकते. अशी चरित्रे वा आत्मचरित्रे एकाद्या व्यक्तीने स्वतःच्या नजरेतून निर्माण करण्याने त्याला कित्येकदा सर्व-स्पर्शी स्वरूप येऊ शकत नाही. यासाठी वर्ण्यव्यक्तीच्या जीवनाविषयी अधिकाराने, तितक्याच जिव्हाळ्याने माहिती देणाऱ्या, आठवणी सांगणाऱ्या व्यक्तींच्या मतांचाही विचार करणे अगत्याचे असते. प्रमाणांवर आधारित अशी चरित्रे लिहिण्याचा प्रघात आधुनिक काळात रूढ झाला आहे. तथापि प्राचीन मराठी वाङमयातील संतांची वा ऐतिहासिक थोर पुरुषांची चरित्रे पाहिल्यास त्यात अद्‌भुतांचा प्रभाव अधिक आढळतो. दंतकथा आणि आख्यायिका यांचा आधार दूरच्या काळातील लेखकास कित्येकदा घ्यावा लागतो; परंतु समकालीन कवींना किंवा शाहिरांनाही वर्ण्य व्यक्तींचे माहात्म्य वर्णून सांगताना त्यात अद्‌भुततेचा भाग आणल्याखेरीज राहवत नाही, हे विशेष. अर्थात अशी संतचरित्रे लिहिणाऱ्यांचा उद्देश त्यांचे गुणगान करावे हाच असतो. संतकोटीतील व्यक्तींचे माहात्म्य सांगताना साहजिकच त्यांच्या जीवनात दैवी चमत्कार दाखविण्याकडे कल राहतो. ऐतिहासिक पुरुषांची चरित्रे रेखाटताना त्यांच्या आश्रयाला राहिल्याने स्वामीभक्तीचा भाग साहजिक येतो. त्यांच्या परा-क्रमाने प्रभावित वीररसाला पोषक प्रसंग शोधले जातात. आणि अशी माहिती बऱ्याच वेळा ऐकीव स्वरूपाची असते. त्यामुळे अशा चरित्रांना विश्वासार्ह स्वरूप प्राप्त होऊ शकत नाही. त्यादृष्टीने त्या त्या काळात अशा घटनांची नोंद ठेवणे अत्यंत जरूरीचे असते. त्या व्यक्तींच्या सहवासात आलेल्या व्यक्तींच्या स्मृतींना म्हणूनच महत्त्व असते. अर्थात कित्येक वेळा अशा आठवणी सांगत असताना स्वतःचे मोठेपण सिद्ध करण्याचा प्रयत्न जाणता वा अजाणता कित्येकां-कडून होत असतो. परंतु अशा तऱ्हेचा कोणताही हेतु उराशी न बाळगता जे कथन केलेले असते त्याला साहजिकच महत्त्व येते. महानुभाव वाङमयातील 'लीलाचरित्र', 'स्मृतिस्थळ' किंवा 'गोविन्दप्रभु-चरित्र' अशा ग्रंथाचे या दृष्टीने मोठे महत्त्व आहे.

## चरित्रकार

महानुभाव पंथातील थोर पंडित महेंद्रभट यास मराठीतील आद्य चरित्रकार असे म्हटले जाते आणि त्यांच्या या पदवीवर अधिकार सांगणारा दुसरा कोणी अद्यापि पुढे आलेला नाही. महेंद्रभटाने आपल्या पंथातील थोर व्यक्तींच्या आठवणी संगृहीत करण्याचे अमोल कार्य केले आहे. या आठवणी सांगणाऱ्या व्यक्ती समाजातील वेगवेगळ्या थरातील आहेत. ज्या विशिष्ट संदर्भात आणि विशिष्ट ठिकाणी त्यांचा संबंध आला त्या हकिगती ससंदर्भ देण्याचा प्रयत्न त्यांनी केलेला आहे. या हकिगती त्याच्या स्वतःच्याच शब्दात देऊन महेंद्रभटाने त्यांच्या भावना आणि बोलीभाषेचे स्वरूप समजावून घेण्यास मोठी मदत केली आहे. या स्मृतींना प्रामाण्य येण्याकरिता त्या त्याने काही अधिकारी व्यक्तींकडून किंवा संबंधित जाणत्यांकडून संशोधित केल्या आहेत. यावरून आणि महानुभाव पंथाचा शब्दप्रामाण्यावरील विश्वास लक्षात घेता या स्मृती अधिकृत स्वरूपाच्या आहेत, असेच म्हटले पाहिजे.

म्हाइंभट हा अत्यंत बुद्धिमान् तसाच श्रीमान् होता. या दोहोंचा समन्वय झाल्याने साहजिकच

अहंकाराचा पगडा त्याचे ठिकाणी मोठा होता. तो विलक्षण तीक्ष्ण बुद्धीचा होता. बिकट परीक्षा देऊन त्याने 'प्रभाकर' नावाची विद्या हस्तगत केली आणि 'निर्वीरमुर्वीतलम्' अशा थाटात पायात गवताच्या वाक्या आणि हातात दिवसा मशाल घेऊन तो हिंडू लागला. चक्रधराची प्रथम भेट झाली तर नमस्काराच्या बाबतही तो ताठ राहिला. गोविन्दप्रभूना अनुसरल्या-नंतरही तो स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाला विसरू शकला नाही. नागदेवासारख्यांना तो 'सुंटदेव' म्हणत असे; परंतु त्याच्या ठिकाणचा अहंभाव चक्रधरांनी तसेच नागदेवाचार्यांनाही चांगलाच ठेचला. स्वतःच्या बुद्धिमत्तेचा गर्व बाळगून तो स्वतःला 'योगभ्रष्ट' म्हणवून घेई. पण नागदेवाचार्यांनी त्याला म्हटले, 'योगभ्रष्ट तंव माझीये दसेचा नव्हे: मा तुमचीये दसेचा काई होइल'. (१९ स्मृ. स्थ.) म्हाइंभटाच्या ठिकाणचा बुद्धिमान पुरुष नेहमी जागृत असे. तो एकदा पोथी वाचीत बसला होता. शेजारी बसलेल्या एका गृहस्थाने दोन चार शब्द ऐकून 'अबद्ध' असे म्हटले. तेव्हा म्हाइंभट म्हणाले, 'तोंड अवद्ध तरि वाचिजाये: पोथी अबद्ध तरि फाडिजाये' (१७२-स्मृ. स्थ.) त्यांचे बुद्धिचापल्य साध्या प्रसंगातूनसुद्धा चमकून जाते. गांवात भिक्षा करून नदीवर पाण्यासाठी म्हाइंभट गेले. वाळवंटातील विहिरीवर लोक पाणी भरीत होते. तेथ एक विद्वांस होता. त्याने म्हाइंभटाकडे पाहून म्हटले, 'शूद्रस्य शुभं नास्ति'. हे ऐकताच म्हाइंभट ताड्दिशी म्हणाले, 'ब्राह्मणस्य विशेषत:'. आणि हे ऐकून साहजिकच तो चिडला. म्हाइंभटाचा मूळ पिंड विद्वान पंडिताचा. त्यामुळे चर्चा, वादविवाद करावेत, पंडितांना जिंकावे आणि नेतेपद मिळवावे ही भावना त्यांच्या ठिकाणी नेहमीच असे. गोविन्द-प्रभूंना किंवा नागदेवाचार्यांना भेटण्याकरितां अनेक विद्वान किंवा चर्चोत्सुक लोक येत असत. अशा वेळी चर्चेसाठी म्हाइंभटाची योजना होत असे. अशा चर्चेत हरलेले अनेक लोक पुढे पंथास अनुसरले. संस्कृत भाषे-वर त्यांचे चांगलेच प्रभुत्व होते. त्यामुळे चक्रधराशी वादविवाद करताना त्यांनी संस्कृतात बोलावयास सुरवात केली. त्याबरोबर चक्रधरांनीही संस्कृतात उत्तरे दिली. ती ऐकून म्हाइंभटांचा भ्रमनिरास झाला. आणि त्यांनी चक्रधरांना अनुसरण्याचे ठरविले.

लक्ष्मीधरभट आणि म्हाइंभट हे दोघेही संस्कृत पंडित आणि मित्र होते. एकदा या दोघानाही चोरांनी अडविले. तेव्हा म्हाइंभटाने 'ज्वरो वा शस्त्रो वा' असे संस्कृत वचन म्हटले. हे ऐकताच त्या चोरात हृदयपरिवर्तन झाले. आणि 'अरे हे विद्वांस' असे म्हणून त्या लोकांनी त्यांना सोडले. या दोघांच्याही बुद्धिमत्तेबद्दल नागदेवाचार्यांना मोठा आदर होता. इंद्रभटाकडे म्हाइंभटांनी चक्रधर प्रसादाचे वस्त्र मागितले; पण त्याने ते दिले नाही. हे ऐकून नागदेवा-चार्यांना राग येऊन ते म्हणाले, 'म्हाइंभटासारिखे पात्र मागे आणि न दीजे:' याचा अर्थ काय? शेवटी त्यांनी स्वत: जाऊन ते वस्त्र आणले.

## गोविंदप्रभूंचे शिष्यत्व

स्वतःच्या ज्ञानाच्या अहंकारामुळे चक्रधरांच्या प्रथम भेटीत म्हाइंभटाने त्यांना साष्टांग नमस्कार केला नाही. चक्रधरांचा व त्याचा सुरवातीस मराठीत वादविवाद सुरू झाला, पण चर्चेचे गाडे त्याने संस्कृत-मध्ये नेले. तेव्हा अस्खलित संस्कृतमध्ये चक्रधरांनी त्याला उत्तरे दिली. तेव्हा त्यांच्या 'ईश्वरी' स्वरूपाची त्याला जाणीव होऊन त्याने त्यांना दंडवत घातले. नागदेवाच्या ज्ञानाबद्दल म्हाइंभटाच्या मनातील कल्पना चक्रधरांनी काही प्रसंगाने नाहीशा केल्या. आणि चक्रधर नागदेवांची अद्वैत चर्चा ऐकून म्हाइं-भटाचा अहंभाव दूर होऊन त्याने नागदेवाला प्रणिपात केला. एवढेच नव्हे तर चक्रधरांच्या निर्वाणानंतर नागदेवांचे आचार्यपद त्याने एकनिष्ठपणे स्वीकारले. चक्रधरांच्या व्यक्तिमत्त्वाने प्रभावित झालेल्या म्हाइंभटाने शिष्यत्व स्वीकारले ते मात्र गोविंदप्रभूंचे. चक्रधरांना अनुसरण्याचा विचार असतानाही तो गोविंदप्रभूंकडे गेला. याची एक मजेशीर हकिगत आहे. प्रातर्विधीसाठी गंगेवर गेलेल्या म्हाइंभटाच्या हातातील मातीचे ढेकूळ पाण्याने विरघळू लागले. आणि त्यावरून आयुष्याच्या नश्वरतेची त्याला खात्री पटली. सर्व निरवानिरव करून जावे असा त्याचा विचार मागे पडला आणि आता याक्षणीच अनुसरावे म्हणून तो निघाला. आप्तेष्ट जवळच असल्याने पुन्हा मोहाचा क्षण नको म्हणून जवळच्या चक्रधरांकडे न जाता ऋद्धिपुरास असलेल्या गोविंद-प्रभूंकडे तो आला आणि त्यांचे शिष्यत्व त्याने पत्करले.

चक्रधर त्यांना 'परमेश्वरावतार' मानीत हे त्याला माहित होते. गोविन्दप्रभू आणि म्हाइंभट यांचे गुरु-शिष्यत्व हा जणु एक विधिसंकेतच होता. उंची वस्त्र पांघरलेला म्हाइंभट सराळचाहून निघाला. वाटेत एका ब्राह्मणाला ते वस्त्र देऊन त्याने घोंगडी घेतली. सात दामांचा गूळ घेऊन चौकशी करीत तो ऋद्धिपुरास आला. 'म्हाइया येणार' याची गोविंद-प्रभूंना कल्पना होती. तो येण्यापूर्वीच ते म्हणाले होते '...म्हाइया येइल म्हणे : गुळु आणील म्हणे :' आणि शेवटी म्हाइया गूळ घेऊन आला. त्याने श्री-चरणी दंडवत घातले. परमभक्ताची भेट प्रभूंनी मोठ्या आवडीने स्वीकारली : "श्रीकरीं गुळु घेतला : श्रीमुखीं घातलाः खावों लागले : आवो मेला जाए : गोड आहे म्हणे : म्हणौनि दुसरेनि श्रीकरें भेली श्रीमुखीं घातली : आणि आरोगुं लागले : ते श्रीमुखुनी ओघळ नीगेति : ते खाडमाखे : दोंदावरि गळे : ऐसा गुळु आरोगीला :" ....मग म्हाइंभट गोसावियांचे सेवा-दास्य करू लागले.

परमेश्वरावतारी गोविंदप्रभूंची सेवा म्हाइंभटांनी मोठ्या श्रद्धेने आणि एकनिष्ठपणाने केली. चक्र-धरांनी पुरस्कारिलेल्या पंथीय तत्त्वज्ञानाचा पुरस्कार किंवा प्रचाराचे कार्य त्याने केल्याचे दिसत नाही. चक्रधर नागदेवांशी वागताना भक्तिभावनेपेक्षा विकल्प निर्माण होण्याची शक्यता कदाचित त्याला वाटली असावी आणि म्हणून त्यांच्या विषयींचा आदरभाव कायम रहावा आणि गुरुसेवाही मनोभावे करता यावी या दृष्टीन त्याने गोविंदप्रभूंचे सेवादास्य स्वीकारले असावे. शिक्षण आणि घराण्याचे उत्तम संस्कार झालेला म्हाइंभट गोविन्दप्रभूंची काळजी वाहू लागला. गोविंदप्रभूंकरिता उत्तम श्वेत आहार त्यांना द्यावा. उत्तम मौल्यवान वस्त्रे द्यावीत अशी त्याची मनापासूनची इच्छा असे. परंतु यामागे जी अहंभावना असे ती गोविंदप्रभूंच्या चट्दिशी लक्षात येई आणि त्यांच्या कृतिमागील वैयर्थ्य दाखविण्या-करिता गोविंदप्रभू त्याने आणलेली वस्त्रे चिखलात घालीत. असाच प्रकार म्हाइंभटानी 'चोखणे' लावून यज्ञोपवीत धुतले तेव्हा गोविंदप्रभूंनी केला.

गोविंदप्रभूंचे अलौकिकत्व म्हाइंभटासारख्या भक्ताला पटले तरी सर्वसामान्य माणसांना त्यांच्या चमत्कारिक वागण्यांचा अर्थ कळणे अवघड होई. कित्येक वेळा स्वतः म्हाइंभटांनाच अशा लोकांना काय वाटेल याची मोठी काळजी लागून राही. अशा वेळी त्या त्या व्यक्तींचे सांत्वन करण्याचा, समजूत काढण्याचा, किंवा नुकसानभरपाई देण्याचा प्रयत्न करीत असत. म्हाइंभटाच्या या प्रयत्नामागील हळुवार भावना ध्यानात घेण्याजोगी आहे. हा थोर पुरुष 'गोविंदप्रभूंपुढे किती विनयाने वागतो हे पाहिले म्हणजे त्याच्या मृदू आणि भाविक अंतःकरणाची साक्ष पटल्याखेरीज रहात नाही. दामूर्त नावाच्या एका भक्तावर रागावून गोविंदप्रभूंनी त्याला नारळ हाणला व निघून जाण्यास सांगितले. संधी मिळताच नागदेव आणि म्हाइंभट त्याच्या समाचारासाठी जातात; परंतु त्यांच्या आगमनापूर्वीच गोविंदप्रभू त्याच्याकडे येऊन गेल्याचे त्यांना समजते. भक्तावर क्षणात रागावणारा आणि त्यांच्या दुःखानी व्यथित होऊन त्यांचे सांत्वन करण्यासाठी धावणारा गुरु आपल्याला लाभला यामुळे साहजिकच त्यांना धन्यधन्य वाटले. गोविंदप्रभू एकदा वोडणझडप्याच्या घरी गेले. तो परगावी गेला होता. त्याच्या घरात शिरताना त्याच्या पत्नीने गोविंदप्रभूंना अडविले, तेव्हा तिला बाजूस करून ते आत गेले आणि 'उतरंडीचे डेरे दोंदोसि धरुनि उतरीति : समोर आणिति : आणि माजिघरी फोडीति : तीळ : तांदूळ : गहु : जोहळे : उडीद : चवळे: ऐसे आवघे एकत्र केले' अशी त्यांची क्रीडा सुरू झाली. एवढ्यात वोडणझडप येताना दिसला. 'आणि भट म्हाइंभट भेओ लागले' 'कसे होईल पां ?' अशी चिंता निर्माण झाली. पुढे जाऊन त्यांनी सांगितले 'वोडणझडपहो ! तुमचेया घरांसि राउळे वीजें केलें असे :' तेणे म्हणीतलें 'माझे दैव भाग्य :' आणि त्याने पत्नीला बोल लावून गोविंदप्रभूंची यथाशक्ती सेवा केली. सर्वांचे त्यांच्या समवेत जेवण झाले. भोजनाबरोबरच गोविंदप्रभूंबद्दलचा भक्ताचा भोळा भाव पाहून त्यांची अंतःकरणेही तृप्त झाली.

गोविंदप्रभू वेळीअवेळी कोणताही पदार्थ वा फळे मागत आणि ती ती वस्तु स्मरणात ठेवून म्हाइंभट कोठूनही कोणत्याही प्रकारे मिळविण्याचा प्रयत्न करीत. एकदा गव्हाच्या लोंब्या तर एकदा त्यांनी अवकाळी आंबेच मागितले. भाद्रपदाचा महिना.



अनुक्रमणिका

पण झाडांवर श्रावण आंबा तयार होता. खास राजाकरिता राखून ठेवलेल्या त्या आंब्याना फडकी बांधलेली होती. व राखणाइतही ठेवण्यात आले होते. पण मध्यान्हरात्री गोविंदप्रभूंकरिता ते आंबे चोरून आणले गेले. ऋद्धिपूर येथील राजमद म्हाइंभटानी गोविंदप्रभूंकरिता घेऊन दिला. गोविंदप्रभूंचे त्या ठिकाणी वास्तव्य व्हावे. त्यांचे 'निवासस्थान' तेथेच असावे अशी भक्तांची इच्छा होती. एक स्मृती त्यासंबंधी सांगते. गोविंदप्रभू नसले तर 'रोधपुरी राउळेंवीण अरीष्टें उठीताति : एकासि ज्वरु येताति : एका खोकले लागताति : एका खते खांडुके होताति : एका कुष्टें लागताति : एका खरुजा लागताति : ऐसा अवघा लोकु पीडा भुतला :' लोकांचे आर्त पुरविण्यासाठी मठाबरोबरच बाजूचे आवारही म्हाइंभटाने मिळविले आणि त्यासाठी 'तांबेयाचे पत्र' केले. गोविंदप्रभूंच्या अनेक आवडीप्रमाणेच या गोष्टीसाठीही म्हाइंभटानी स्वतःचे द्रव्य वापरले होते. राजमठामुळे गोविंदप्रभूंच्या वास्तव्याला स्थिरता आली. आणि त्यामुळे तदनुषंगिक काही उपचारही आले. पाडव्याच्या दिवशी गोविंदप्रभूंना ओवाळण्यासाठी नगरस्त्रिया येत. त्यांच्या थाळचात म्हाइंभट चोळचा ठेवीत असे. गोविंदप्रभूंसमोर गायन करणाऱ्यास त्याने रेशमी वस्त्र दिले. गोविंदप्रभूंच्या आग्रहाखातर सराफ कट्टचात ते काही वेळ 'सोने चोरू' ही झाले. त्या सराफ कट्टचात 'हातीं मुद्रिका : डोईस टोपरें : अंगीं अंगीया : ऐसे बसति : परंतु विहारी परत आल्यानंतर मात्र म्हाइंभट 'मुद्रिका अंगीया टोपरें फेडीती : मग आचळे नेसेति : कंथा पांगुरेति : मग भिक्षेसि जाति :'

घरच्या श्रीमंतीमुळे उत्तम अन्न आणि उत्तम वस्त्रे यांची सवय असलेल्या म्हाइंभटाला पंथात प्रवेश केल्यानंतर भिक्षेचे अन्न खाणे किती जड गेले असेल याची आपण कल्पना करू शकतो. भिक्षेच्या अन्नातील एक घास घेताच सुरवातीला तर त्याला उलटीच झाली. पण हळूहळू त्याने त्या अन्नाचीही सवय लावून घेतली. 'काही प्रसंगी सराफ कट्टचात जाणारा, व्यवहार करणारा हा गृहस्थ भिक्षेचे अन्न खात नसावा, गाईला घालीत असावा' अशी साहजिकच लोकांची कल्पना झाली आणि त्यामुळे ते 'म्हाइंभटासि नासले : वीटलें : आंबलें : घटइलें: खरवडि : कोंडा ऐसे भिक्षेसि घालीति :' परंतु तीच भिक्षा गोसाव्यांना दृष्टीपूत करून आडाच्या काठी बसून, एकत्र कालवून म्हाइंभट खात असत. आणि चिखलवनी पीत असत. एवढचात गोविंदप्रभू तेथे यायचे. म्हाइंभटाचे ते भिक्षाभोजन पाहून ते संतुष्ट व्हायचे आणि म्हणायचे 'ऐया माझा आता होय म्हणे:' एकदा त्यांनी 'चारु होय म्हणे : वारु होय म्हणे : चारु तो वारु होय म्हणे :' असे म्हणून म्हाइंभटाचे 'चारुवारु' असे नाव ठेवले होते. नागदेवाचार्यांनाही 'हरिमा' असे नाव त्यांनी ठेवले होते. गोविंदप्रभूंचे देहावसान झाल्यानंतर खांदा देणाऱ्यात म्हाइंभटही होता. नागदेवाचार्यांना त्यांची गोविंदप्रभूवरील श्रद्धा चांगल्या परिचयाची होती आणि त्यांच्या या विश्वासामुळेच एकदा पैजेने त्यांनी म्हटले होते, 'म्हाइंभटातें श्रीप्रभुदास्यावेगळें जो दाखवी तयांसि मी महावाक्य वाखाणिन.'

वैयक्तिक जीवनात मात्र म्हाइंभट फारसा सुखी नव्हता असे दिसते. देमाइसा किंवा देमती ही त्याची पत्नी. म्हाइंभटाने पंथात प्रवेश केल्यानंतर तीही पंथात आली; परंतु विरक्ताला शोभेल असे तिचे वर्तन मात्र नव्हते. गोविंदप्रभूंना भोजनात पोळचा वाढतानाही तिने चुकारपणा केला. एकदा देमाइसा आणि कोथळोवा पायावर पाय ठेवून तांदूळ सडीत होती. एवढचात म्हाइंभट बाहेरून आले आणि त्यांच्या दृष्टीस हा चमत्कारिक प्रकार पडला. त्याच्या मनात विकल्प निर्माण झाला.त्यांना वाटले, 'देहा ऐसें होए आणि रात्री तैसे होए' एवढचात गोविन्दप्रभू तेथे आले आणि त्यांनी त्यांना पाय बाजूस घेण्यास सांगितले. त्या दिवसापासून कोथळोवाने अन्न, पाणी वर्ज्य केले: काळवंडले : तीळ तीळ झिजूं लागले. रोडले : तेव्हा गोविंदप्रभू म्हणाले, 'कोथळा ऐसा नव्हे म्हणे :' आणि हे म्हाइंभटानाही पटले. कोथळोवाचा कैपक्ष घेऊन त्यांनी एकदा देमाइसेला वाक्ताडनही केले होते. एकदा देमाइसेच्या करवटीने–लाकडी भांडचाने कोथळोवा पाणी प्याला. 'तू शूद्र असता माझ्या करवतीचे पाणी कसें प्यालास ?' असे देमाइसा म्हणाली. तेव्हा म्हाइंभट म्हणाले, 'तुझा दोन्ही देवांशी संबंध : आबाइसा सारखी माता आणि नागदेवासारखा बंधु. असे असता अजून तुझे अज्ञान कसे गेले नाही ? कोथळोवाने तुझ्या करवतीचे पाणी











घ्यावे हे तुझे भाग्य नव्हे काय ? असे म्हणून त्यांनी तिला कोथळोबास दंडवत घालावयास लाविले.

एकाद देमाइसेने म्हाइंभटाच्या पिशवीतून त्याला न विचारता दोन आसू (नाणी) काढून घेतली. नंतर म्हाइंभटांनी पाहिले, तर पिशवीत दोन आसू नाहीत. 'कोणी काढल्या ? कोणी वडिलानीच. वडीलबाऱ्यांनीच काढून घेतल्या असतील' असे म्हणून त्यांनी महदाईसेचा संशय घेतला. 'देमाइसे-वाचून कोण करणार ? ' या कल्पनेने महदाइसेने एक युक्ती योजिली. तिने अवचितपणे देमाइसेच्या डोकीला तेल लावले. माखले. मग तिच्याकडून अंगातील चोळी काढविली. आणि दमाइसेकडून पाणी घातले. तेवढ्यात तिने चोळीच्या वाखोरीत पाहिले. तेव्हा तिला तिथे त्या दोन्ही आसू दिसल्या. ती चोळी घेऊन म्हाइंभटाजवळ आली आणि म्हणाली, 'घ्या तुमच्या दोन्ही आसू. तुमच्या बायकोच्या वाखोरीलाच आहेत.' ते पाहिल्यानंतर म्हाइंभटांना मोठा अनुताप झाला. 'मी पापीया हो आई' म्हणून ते तिच्या पायी पडले. मग महदाइसा म्हणाली 'या आसू आता तिलाच द्या व तिला आणखी काही बोलू नका.' म्हाइंभटांनी ते मानले आणि त्याप्रमाणे केले. मग महदाइसेने म्हटले, ' आता घाला गुरुकुळाला दंडवत. तुम्ही गुरुकुळाबद्दल वेगळी कल्पना केलीत.' 'ठीक आहे आई' असे म्हणून म्हाइंभटांनी शेणा-मातीने अंग माखून घेतले. आणि 'मी पापी, गुरु-कुळाचा संशय घेतला, मला सर्वांनी क्षमा करावी' असे म्हणून सर्व गुरुकुळाला दंडवत घातले. तेव्हा नागदेवांनी 'उठा उठा' असे म्हणून उठविले. त्या-नंतर म्हाइंभटांनी आपल्याजवळ असलेला सर्व परिग्रह नागदेवांच्या हाती आणून दिला आणि दंडवत घालून म्हटले 'आज पासून मी सर्वसंग परित्याग केला'. तेव्हापासून म्हाइंभट आपल्याशी द्रव्यसंग्रह करीनासे झाले. ही स्मृती देमाइसा, महादाइसा आणि म्हाइंभट या तिघांच्याही स्वभावावर प्रकाश टाकणारी आहे.

## स्मृति-संकलनाचा निदिध्यास

म्हाइंभट हा महानुभाव पंथातील पदसिद्ध अधि-कारी पुरुष नसला, तरी गोविंदप्रभु आणि चक्रधर यांच्या भक्तीत तो कोणासही हार जाणार नाही. या दोघांच्याही सहवास सांनिध्याचा लाभ त्याला झाला होता. त्यांच्या जीवनाशी तो एकरूप झाला होता. त्यामुळेच की काय त्यांच्या निधनानंतर त्यांच्या स्मृतींचे संकलन करण्याचे त्याने ठरविले असावे. जणु त्यांच्या एकेक स्मृती आठवताना, ऐकताना आणि लिहिताना त्यांच्या सहवासातील जीवनच तो जगत होता. 'लीलाचरित्र' 'स्मृतिस्थळ' 'गोविंदप्रभूचरित्र' ही पंथाच्या प्रमुख व्यक्तींची चरित्रे सहजी चाळली तरी त्या त्या व्यक्तींच्या साध्यासुध्या वर्तनक्रमाविषयी चरित्रलेखकाला वाट-णारा भक्तिभाव त्यातून ओथंबून राहिल्याचे लक्षात येईल. या आठवणी जमविण्याचा निदिध्यास त्याने घेतला होता. उन्हा–पावसाची, थंडीवाऱ्याची पर्वा त्याने केली नाही. 'येतां जातां उठत बसतां घास गिळतां' आपल्या प्रभूंची आठवण त्यांना व्हायची. त्यांची मूर्ती शब्दरूपाने साकार करण्याचे वेड लागून राहिले होते. चक्रधरांच्या आठवणी मिळविण्याकरिता म्हाइंभट खेइभटाच्या गावी गेले. खेइभट शेतावर गेले होते, तर म्हाइंभट तेथे गेले आणि चक्रधरांच्या आठवणी सांगण्याची त्याने त्यास विनंती केली. खेइभटाने ते कबूल केले. पण त्या आठवणी मिळाल्या कशा? स्मृतिकार सांगतो, 'खेइभट कृषीकर्म करीति : आणि म्हाइंभट तया मागां मागां गोसावी-यांचीया लीळा पुसति :' खेइभट सांधति : त्या म्हाइंभट नमस्कारूनि घेति :' म्हाइंभटाची ही चिकाटी थक्क करून सोडणारी आहे. आठवणी जमविण्याची एकही संधी तो वाया घालवीत नसे. आणि असे काही घडले तर त्याच्या जीवाला मोठी चुटपूट लागून राहात असे. एकदा विजनात म्हाइंभट बसले असताना गदो-नायकांनी त्यांना पाहिले. तेव्हा लागलीच घोड्यावरून उतरून त्यांनी त्याना नमस्कार केला आणि त्यांनी विचारले, 'आपण कोण महात्मे? ' पण म्हाइंभटानी मौनभंग केला नाही. तेव्हा त्यांना नमस्कार करून गदोनायक निघून गेले. नंतर येणाऱ्या बड्व्याला म्हाइं-भटाने 'हे कोण' असे विचारता 'ते गदोनायक' अशी माहिती मिळाली. तेव्हा त्याच्या मनाला मोठी खंत लागून राहिली. 'अरेरे, मी पापी! त्याच्याशी बोलतो, तर त्यांना गोसाव्यांच्या लीळा तरी विचारल्या असत्या' असे म्हणून एक संस्कृत श्लोक त्याने म्हटला–

'अपरीक्ष्य न कर्तव्यं कर्तव्यं सुपरीक्षितम् ।
पश्चाद् भवति संतापो ब्राह्मणी नकुलो यथा.'








अनुक्रमणिका

भिक्षार्जनास गेले असताना काहीजण त्यांना मुद्दाम आग्रहाने बोलवीत, त्यांना भक्तीने काही देऊ करीत. परंतु त्याचा स्वीकार करण्यापूर्वी गोसाव्यांच्या काही लीला ऐकविल्या पाहिजेत अशी म्हाइंभटाची अट असे. एकदा प्रतिष्ठानकडे लीला जमविण्याकरिता ते गेले असता सारंग पंडिताला भेटले. सारंग पंडिताने त्यांचा सत्कार करण्याचे ठरविले, परंतु गोसाव्यांच्या लीला सांगितल्याखेरीज आपण काही घेणार नाही असे म्हाइंभटांनी सांगितले. त्या ऐकल्यानंतरच चक्रधरांचा प्रसाद त्यांनी घेतला. अशा तऱ्हेने अतीव श्रद्धेने म्हाइंभटांनी या आठवणी गोळा केल्या तरी त्यांना अधिकृत स्वरूप येण्यासाठी त्यावर अधिकारी हात फिरण्याची आवश्यकता होतीच आणि याबाबतीत नागदेवाचार्यांचा अधिकार अर्थातच सर्व मान्य होता. म्हाइंभटांनी या आठवणींची संपादणी नागदेवाचार्यांच्या साहाय्याने केली. श्रीमुखींचे निश्चित शब्द कोणते, कोणते नव्हेत हे त्यांनी सांगितले. ज्याच्या अनुभवाच्या लीला असतील त्या त्यांनाच विचाराव्यात असेही त्यांनी सुचविले. त्याप्रमाणे करून म्हाइंभटानी लीलांचे पूर्वार्ध-उत्तरार्ध असे दोन विभाग केले. या दृष्टीने म्हाइंभट हा मराठीचा आद्य संशोधक, संपादक आणि चरित्रकार होता, असेच म्हणावे लागेल.

## इतर ग्रंथरचना

आद्य मराठी कवयित्री महदाइसा आणि म्हाइंभट यांचे संबंध अत्यंत जिव्हाळचाचे होते. गोविंदप्रभूंच्या सांगण्यावरून स्फूर्ती होऊन तिने 'धवळे' रचले. या धवळचांचा उत्तरार्ध लिहिला जावा असा म्हाइंभटांनी, तिच्याकडे आग्रह धरला. पण आपणास आता स्फूर्ती होत नाही असे तिने कळवळून सांगितले. तेव्हा उत्तरार्ध हा म्हाइंभटानीच लिहिला असे म्हटले जाते. म्हाइंभटांची इतर ग्रंथरचना फारशी उपलब्ध नाही. उपलब्ध आहेत त्या त्यांच्या दहा आरत्या. या आरत्यांना महानुभाव पंथात 'जतीचा दशकु' असे म्हटले जाते. त्याशिवाय आणखीही काही आरत्या त्यांच्या नावावर आहेत. संस्कृत भाषा पंडित असलेल्या म्हाइंभटांचे नावावर काही टीकात्मक व तत्त्वज्ञानपर रचना कशी नाही याचे आश्चर्य वाटते. वास्तविक तशी कुवत त्यांचे ठिकाणी निश्चितपणे होती. एका स्मृतीत म्हटले आहे ' एकदा म्हाइंभट गीतेवर भाष्य करीत होते. 'आपणचि पदे करीति : आणि आपणचि अर्थ करीति : आपणचि संथा करीति : आपणचि परिहास सुति :' –१३५ (गो. प्र. च.) अशा तऱ्हेच्या म्हाइंभटाच्या टीका त्या त्यावेळी लिहिल्या गेल्या असत्या तर महानुभाव आणि पर्यायाने मराठी वाङमयात मोलाची भर पडली असती.

## अखेर :

आपल्या गुरूंचे जणु शाब्दिक स्मारक करून म्हाइंभट कृतकृत्य झाले. व्यवहारी जगात आता त्यांना रस वाटेनासा झाला. ज्यांच्यासाठी जीव पाखडावयाचा त्या मूर्ती आता अदृश्य झाल्या होत्या. मग आता स्वतःचे देहभान कुठले राहणार? उर्वरित आयुष्य अटनविजनात त्यांनी घालविले, परंतु अशक्तपणा अतिशय आला. आपला शेवट ऋद्धिपुरास व्हावा या इच्छेने दमाइसेच्या साहाय्याने ते तिथे आले. म्हाइंभट आल्याचे समजताच भटोवास त्यांना सामोरे गेले. महाद्वाराजवळच उभयतांची भेट झाली. म्हाइंभटानी भरल्या उरानी भटोबासांना म्हटले 'भटो निडळावरि पावो ठेवा' असे म्हणून त्यांनी त्यांचा पाय धरला. परंतु 'निडळावरी पाय तो गोसाव्यांचा' असे म्हणून नागदेवाचार्यांनी आपला हात त्यांचे कपाळावर ठेवला. एके दिवशी म्हाइंभटानी नागदेवांना विचारिले, 'भटो मज देवो होईल ?' यांनी असे का विचारावे असा नागदेवांना प्रश्न पडला म्हणून थोडा वेळ ते स्तब्ध राहिले. त्यामुळे म्हाइंभटांना अत्यंत दुःख झाले. ते म्हणाले, 'मी पापी, मला देव कसा होईल ?' चक्रधरांची आठवण सांगून नागदेव म्हणाले,' तुम्हा जरि देव नव्हे : तरि कोण्हाहि नव्हे : म्हणौनि तुम्हा देव होईल.' हे ऐकल्यानंतर त्यांना समाधान झाले. त्यांनी सर्वांची क्षमा याचना केली. आणि गोविंदप्रभूंच्या सन्निध आपल्याला पुरण्याची त्यांनी विनंती केली. अशा तऱ्हेने आपल्या परमदैवताच्या निदिध्यासातच म्हाइंभटांनी आपल्या जीवनाचा शेवट केला. आपल्या जीवनातील



अनुक्रमणिका






कृतापराधांची जाणीव होऊन कदाचित म्हाइंभटांना पश्चात्ताप झाला असावा; परंतु चक्रधर आणि गोविंदप्रभू या दोघांचे सेवा-दास्य लक्षात घेता ह्यांना देव व्हावयास हरकत नसावी असेच नागदेवाचार्यांना वाटले असावे.

महानुभावीय पंथधुरीणांच्या या चरित्रकाराने आपल्या पंथाच्या दृष्टीने मोठे कार्य केले आहे, हे तर खरेच. परंतु साधनांच्या अभावी महाराष्ट्राच्या तत्कालीन इतिहासावावत अंधकारात असणाऱ्यांना मोठीच सामुग्री मिळवून दिली आहे. तत्कालीन सामाजिक आणि राजकीय परिस्थिती, धार्मिक समजुती, तत्कालीन वाक्प्रचार यांचे फारच चांगले दर्शन या चरित्रग्रंथातून होते. वोलीभाषेचा टवटवीतपणा आजही आपल्याला जाणवतो. फारसा पाल्हाळ नसलेल्या आणि नेमके सांगणाऱ्या या स्मृती अंतःकरणाला चटका लावून जातात. 'नामूलं लिख्यते किंचित्' हा निर्धार म्हाइंभटाने केलेला दिसतो. यामुळे कित्येक आठवणी त्रोटक वाटतातः परंतु त्यांना स्वतःच्या मल्लीनाथीचे अस्तर म्हाइंभटाने जोडलेले दिसत नाही.

या स्मृतीचा अभ्यास वा वाचन करीत असताना एक गोष्ट प्रामुख्याने लक्षात आली, ती ही की या स्मृतींमधून एकसंध जीवन वा व्यक्तिचित्र नजरेसमोर उभे राहू शकत नाही. गोविंदप्रभू, चक्रधर, नागदेव किंवा अशा अनेक व्यक्तींच्या स्मृती देताना त्यात काळांचे आणि स्थळाचे महत्त्व ध्यानात घेतले आहे हे खरे. तथापि त्यावरून त्या व्यक्तीच्या जीवनातील चढउतारांचे बारकावे लक्षात येऊ शकत नाहीत, हेही खरे आहे. शिवाय अशा तऱ्हेचा लेखी किंवा अन्य स्वरूपाचा आधारही सापडत नाही. अशा स्थितीत महेंद्रभटाने केलेल्या थोर कार्याची कल्पना येऊ शकते. महानुभाव पंथातील परमेश्वर स्वरूप व्यक्तीच्या प्रत्येक हालचालीचे आणि कृत्याचे स्मरण त्यांच्या भक्तांना परमप्रिय असते. त्या दृष्टीने त्या त्या व्यक्तीच्या जीवनातील सर्वसामान्य प्रसंगानाही यात स्थान मिळालेले आहे. या स्मृती आपल्या समोर ठेवताना त्या स्मृतिकाराच्या शब्दात देण्याची काळजी महेंद्रभटाने घेतलेली आहे.

या स्मृतीमधील काही दुवे हाती लागत नाहीत हे खरे, परंतु महानुभाव पंथातील बऱ्याच थोर व्यक्तींच्या जीवनावर प्रकाश पडण्यास त्यामुळे मोठी मदत झाली आहे. या स्मृतींच्या आधारे त्यांच्या वैयक्तिक जीवनांचा शोध घेण्याचा मार्ग सोपा झाला आहे. महानुभाव पंथातील थोरांच्या सांनिध्यातच म्हाइंभट राहिला असल्याने त्यांच्याही जीवनातील अनेक घटनांचे दर्शन या स्मृतीतून घडते. अहंकारी पंडितापासून आत भक्तापर्यंत होत गेलेली म्हाइंभटाच्या जीवनातील स्थित्यंतरे आपल्यासमोर उभी राहतात.

---

## पत्रव्यवहार

श्री. संपादक, 'नवभारत',

नवभारतच्या नोव्हेंबर अंकातील श्री. कंटक यांचा लेख पाहिला. श्री. शेजवलकरांच्या शिवचरित्रावरील आपल्या मासिकांतील चर्चा एकतर्फीच होत होती. दुसरी बाजू वाचकांपुढे मांडण्याचे औचित्य या लेखामुळे काहीसे साधले गेले आहे.

एक गोष्ट पुनः पुनः खटकते. श्री. शेजवलकरांच्या मृत्यूनंतर समाचार घेण्यासाठी आमच्या पंडितांनी हिरीरीने पुढे यावे हे एक आश्चर्यच आहे. विशेषतः प्रा. न. र. फाटक यांचे दोन लेख हे तर सदभिरुचीला धक्का देणारेच आहेत. नवभारत मासिकात त्यांच्या यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या रामदासी वादावरील लेखांशी मिळत्याजुळत्या चालीवरच ते आहेत. श्री. कंटक यांनी त्यांकडे पूर्ण दुर्लक्ष केले ही नवभारताचा एक चाहता म्हणून मला अत्यंत समाधानाची गोष्ट वाटते.

परंतु मासिकाचा दर्जा धोक्यात आणणारे असे प्रा. फाटकांचे 'हे' लेखन आपण का प्रसिद्ध करावे याचा मात्र उलगडा होत नाही. फाटकांच्या स्वभावाचे एक वैशिष्टय कायमचे ध्यानात येण्याजोगा भरभक्कम पुरावा उपलब्ध करून देण्याचा धूर्तपणा आपण दाखविला की काय अशी शंका येते. तसे असल्यास यापुढे तरी असे होऊ नये. हा पुरावा इतरत्र उपलब्ध झाल्याने भावी पिढ्यांचे विशेष नुकसान होईलसे नाही असे आपणास सुचवावेसे वाटते.

—रा. कृ. जोशी.

श्री. प्रभाकर पुजारी

# इतिहास आणि ऐतिहासिक नाटक

'रायगडाला जेव्हा जाग येते' हे श्री. वसंत कानेटकरांचे नाटक शिवरायांच्या व्यक्तिमत्त्वाचे आणि त्यांच्या जीवनातील तीव्र नाटयाचे प्रभावी दर्शन घडविण्यात जेवढे समर्थ ठरलेले आहे तेवढेच ते एक ऐतिहासिक नाटक म्हणून सामान्य दर्जाचे ठरलेले आहे. या नाटकाचे स्वरूप पाहण्यापूर्वी श्री. कानेटकर व श्री. वा. ल. कुलकर्णी यांनी इतिहास व ललित वाङमय यांच्या परस्परसंबंधांविषयी जे सिद्धान्त मांडलेले आहेत त्यांचा विचार करणे आवश्यक आहे.

## इतिहास, चरित्र, ललितवाङ्मय यांचा केन्द्रबिंदू एकच

ललित वाङमयाच्या स्वरूपाविषयीच्या व साहित्यिकाच्या प्रतिभेविषयीच्या अफाट कल्पना अलीकडे दृढमूल झालेल्या आहेत. वाङमयनिर्मिती ही ईश्वरी अवतरणासारखी एक अलौकिक घटना आहे असा विपर्यस्त समज जाणून बुजून पसरवला जात आहे. मानवी जीवनातील निरनिराळया पण एकात्म शक्ती अलग अलग करण्याच्या हव्यासातून जीवनातील निरनिराळया कृतींचे साचेबंद कप्पे पाडण्याची प्रवृत्ती निर्माण झालेली आहे. व्यक्तिजीवनापासून समाज-जीवनापर्यंत, आध्यात्मिक प्रेरणांपासून लौकिक भावनांपर्यंत, वैचारिक प्रगतीपासून मानसिक विकासापर्यंत एकच मानवी विश्व व्यापलेले आहे याची जाणीव हरपली की विपर्यस्त सिद्धान्त निर्माण होतात. वा. ल. कुलकर्ण्यांनी असा सिद्धान्त मांडलेला आहे की इतिहास, चरित्र, व ललितवाङमय यांची विश्वे वेगवेगळी आहेत; आणि इतिहास-चरित्रांना जे व्यक्त करता येत नाही ते ललितवाङमय व्यक्त करू शकते. इतिहास, चरित्र व ललितवाङमय या तिहीतही मानवी प्रेरणांचाच शोध घेतलेला असतो, व्यापक मानवी जीवनाचेच दर्शन घडवलेले असते. मानवी जीवनाचे जिवंत व प्रभावी चित्रण करण्याचे सामर्थ्य ललितवाङमयाइतकेच इतिहासात व चरित्रातही आहे. 'The decline and Fall of The Roman Empire' हा गिब्जचा ग्रंथ श्रेष्ठ इतिहासग्रंथ आहे म्हणूनच ती एक श्रेष्ठ अजोड वाङमयनिर्मिती आहे. त्या ग्रंथातील विशाल आशय आणि जीवन-दर्शनाचे सामर्थ्य या गोष्टी ललितवाङमयाला व्यक्त करता येणार नाहीत. 'पुण्यश्लोक छत्रपती शिवाजी' या श्री. बाळशास्त्री हरदास यांच्या चरित्रात्मक इतिहासग्रंथात शिवरायांचे आणि शिवकालीन इतिहासाचे जे भव्य विराट दशन घडते ते त्या काळा-वर आधारलेल्या कोणत्याही नाटकात वा कादंबरीत घडत नाही. '१८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध' या स्वा. सावरकरांच्या इतिहासग्रंथाने तर इतिहास निर्माण करण्याएवढा प्रभाव पाडला. 'अत्यंत सूक्ष्म संशोधन आणि श्रेष्ठ वाङमयीन सामर्थ्य त्या ग्रंथात एकवटलेले आहे' असा अभिप्राय सर व्हॅलेंटाईन चिरोल यांनी व्यक्त केलेला आहे. त्या ग्रंथाने कित्येक निष्क्रिय तरुणांना क्रांतिकारक बनविले. एवढा प्रभाव कोणत्याही ललितकलाकृतीला सिद्ध करता आलेला नाही. काही इतिहासकारांनी अशी दुर्लंघ्य उंची गाठलेली आहे. 'The Unknown Lincoln' या डेल कार्नेजीच्या चरित्रापुढे कित्येक शोकात्मिका फिक्या ठरतील. लिंकनच्या जीवनावरील एका नाटकाला या चरित्राच्या आसपासही फिरकता आलेले नाही. चर्चिलच्या 'War Memoires' ना वाङमयाचे नोबेल पारितोषिक देण्यात आलेले आहे. चर्चिल, हिटलर, कार्ल मार्क्स, अरविंद, विवेकानंद, जेस्टोव्हस्की यांची मी वाचलेली चरित्रे इतकी प्रभावी आणि वेधक आहेत की त्यांपुढे वाङमयीन कृती आभासात्मक, खुज्या आणि खुरटया वाटल्या. इतिहास-चरित्र–ललितवाङमय यांचे प्रांत वेगवेगळे नाहीत. निरनिराळे परीघ पण एकच केन्द्रबिंदू असलेली व एकमेकांना सामावून घेणारी अशी ती वर्तुळे आहेत.

विविधांगी मानवी जीवन आणि त्या भोवतीचे विश्व त्या वर्तुळांच्या केन्द्रस्थानी आहेत. इतिहासकार, चरित्रकार, ललितलेखक यांपैकी ज्याचे प्रतिभा-सामर्थ्य मोठे असेल तो अधिक विशाल विश्वाचे दर्शन आपल्या कृतीतून घडवू शकतो. इतिहास-चरित्र–ललितवाङ्मय यांना एकमेकांपासून विभक्त करता येत नाही. इतकेच काय पण मानवी जीवनातील कोणत्याही एका द्रव्याला इतर घटकांपासून अलग करता येणे शक्य नाही. इतिहास-चरित्र-ललित-वाङ्मय या साऱ्यांना अंतर्दर्शी प्रतिभेची आवश्यकता आहे.

## वसंत कानेटकरांचे म्हणणे अपसमज पसरवणारे आहे

इतिहास व ललितलेखन यांच्यामधील परस्परसंबंध कसा असला पाहिजे? 'कलाकृती म्हणजे सत्याभास आणि सत्याभास म्हणजे कल्पिताच्या भरारीला अवसर' हा कानेटकरांचा सिद्धान्त अपसमज पसरवणारा आहे. इतिहासाशी संगत सोडण्याचा परवाना ललित-लेखकाला असतो ही त्यांची भूमिका मान्य होण्यासारखी नाही. ऐतिहासिक सत्य डावलण्याचा अधिकार इतिहासकारालाही नाही आणि ललितलेखकालाही नाही. ऐतिहासिक नाटकाने ज्ञात इतिहासाशी संपूर्ण इमान राखले पाहिजे. इतिहास सगळ्या गोष्टी स्पष्ट करीत नाही म्हणूनच ललितलेखकावरची जबाबदारी फार मोठी आहे. इतिहासाने चित्रातील रंग अंधुकपणे भरलेले असतात, रेषा तुटकपणे काढलेल्या असतात आणि भावदर्शन अस्पष्टपणे, धूसरतेने घडवलेले असते. ललितलेखकाला तेच रंग अधिक गडद करावे लागतात, त्याच तुटक रेषा जुळवाव्या लागतात आणि भावदर्शन स्पष्टपणे घडवावे लागते. इतिहासाला ललितकृतीमध्ये स्पष्ट आणि जोमदार बनवणे ही देखील असाधारण प्रतिभेची कर्तबगारी आहे. इतर कलाकृतींना जीवनाशी इमान राखावे लागते तर ऐतिहासिक कलाकृतींना जीवनाबरोबरच इतिहासाशीही इमान राखावे लागते. इतिहासाला डावलून घडवलेली नाट्यकृती गर्दीवर केवढाही प्रभाव गाजवीत असली, तरी श्रेष्ठ कलाकृतीची महती तिला प्राप्त करून घेता येणार नाही. इतिहास जसजसा स्पष्ट होत जातो तसतशी ललितलेखकाची जबाबदारी वाढत जाते. इतिहासातील नाट्याची सूक्ष्म व विविध अंगे त्याला प्रतिभाबळावर जाणावी लागतात, साक्षित्वाच्या भूमिकेवरून विविध व्यक्तींच्या जीवनातील तुल्यबळ नाट्याशी समरस व्हावे लागते. "Shakespeare acquired more essential history from Plutarch than most men could from the whole British Museum" या इलिएट उद्गारात प्रतिभाबळावर इतिहासाचे प्राणतत्त्व हेरण्याचे ललितलेखकाचे सामर्थ्य व्यक्त झालेले आहे. कानेटकरांनी मानल्याप्रमाणे ऐतिहासिक नाटकात ऐतिहासिक सत्य आणि काल्पनिक घटना यांचे मिश्रण नसते. 'काल्पनिक' आणि 'कल्पित' यातील फरक त्यांनी लक्षात घेतलेला नाही. इतिहास अस्पष्ट असतो म्हणून लेखकाच्या कल्पनेला वाटेल तशा भराऱ्या मारता येणार नाहीत. ज्ञानामध्ये आणि अनुभवांमध्ये संगती निर्माण करणारी कल्पकता ही एक मानवी शक्ती आहे. कल्पना ही सत्य अनुभवांची आणि सत्य ज्ञानाची जुळणी करीत असते. 'कल्पित' म्हणजे कल्पनाशक्तीने जाणलेले सत्यच ! ऐतिहासिक सत्याचे स्वरूप कल्पनेने जाणण्याची प्रेरणा ऐतिहासिक नाटकात असली पाहिजे. काही व्यक्ती ज्याप्रमाणे अंतःप्रेरणेने सत्य जाणतात त्याचप्रमाणे ललितलेखक कल्पनाशक्तीच्या व प्रतिभेच्या बळावर ऐतिहासिक सत्यच जाणण्याचा प्रयत्न करीत असतात. लेखकाची प्रतिभा 'जाणती' असेल तर ऐतिहासिक सत्य तो उजळून टाकू शकतो. उदाहरणच द्यायचे तर राजे मास्तरांची कथा श्री. पेंडसे यांना आपल्या आजोबांवरून सुचली. त्यांचे व्यक्तिमत्त्व मनात ठसल्यानंतर 'कल्पनाशक्ती'ने राजे मास्तरांच्या आयुष्यात रेखाटलेले काही प्रसंग प्रत्यक्ष आजोबांच्या जीवनात घडल्याचे नंतर पेंडशांना आढळून आले. ऐतिहासिक सत्याशी जातिवंत इमान असले म्हणजे सुटलेले दुवे कल्पिताचे रूप घेऊन ऐतिहासिक नाटकात अवतरतात. ऐतिहासिक नाटकातील व्यक्तींना जेव्हा लेखक स्वतःचे निरनिराळ्या रंगांचे मुखवटे चढवतो आणि नाटकातील घटना ज्यावेळी इतिहासाला डावलून उभ्या करतो त्यावेळी एक ऐतिहासिक नाटक म्हणून त्या कलाकृतीचा कणा मोडतो आणि प्राण हरपतो ! 'रायगडाला जेव्हा जाग येते' या नाटकात








हेच घडलेले आहे. छत्रपती शिवाजी, संभाजी, प्रधानमंडळ व सोयराबाई यांच्यामधील जिवंत नाटच कानेटकरांना हेरता आलेले नाही. जेवढे हेरता आलेले आहे तेवढे समर्थपणे पेलता आलेले नाही.

### दरबारातील शिवाजी आणि माजघरातील शिवाजी ही विभागणी कितपत यथार्थ

श्री. कानेटकर आणि श्री. वा. ल. कुलकर्णी यांनी 'माणूस शोधण्याच्या प्रयत्ना' ला जे अवास्तव महत्त्व दिलेले आहे ते मला समजू शकत नाही. इतिहासाने दरबारातील छत्रपती रंगवायचे आणि ललितलेखकाने माजघरातील शिवराय रंगवायचे ही विभागणी कोणत्या जीवनतत्त्वाप्रमाणे आहे ते समजत नाही. कोणतेही व्यक्तिमत्त्व एकात्म असते. नाटकातील व्यक्ती आपल्यासारख्या आहेत असे वाटते हे काय नाटकाच्या जिवंतपणाचे व श्रेष्ठत्वाचे गमक आहे? छत्रपतींना आपल्याप्रमाणेच अवयव होते किंवा आपल्याप्रमाणेच विकार होते हे समजल्याने ते आपल्यासारखेही ठरणार नाहीत आणि त्यांच्या उत्तुंग भव्य व्यक्तित्वाचा साक्षात्कारही होणार नाही. छत्रपती त्यांच्या साऱ्या वैशिष्टयांसह आणि सामर्थ्यासह आमच्यापुढे उभे राहावेत हीच आमची नाटकाकडून अपेक्षा आहे. असामान्यांचे असामान्य म्हणूनच दर्शन घडविणे हे प्रतिभावंताचे कर्तव्य आहे. छत्रपती आमच्यासारखेच होते असे आम्हाला वाटायला लावणे ही आमची शुद्ध फसवणूक आहे. ऐतिहासिक व्यक्तींना देवत्व अर्पण करणे हा एका प्रकारचा खोटेपणा आणि त्यांना आपल्याप्रमाणेच विकाराधीन मानणे हा दुसऱ्या प्रकारचा खोटेपणा! कर्तबगार व्यक्तींना सद्‌गुणांचा पुतळा मानणे ही एका प्रकारची फसवणूक आणि दुर्गुणांचे भावविवश तत्त्वज्ञान बनवणे ही दुसऱ्या प्रकारची फसवणूक! नाटकातील व्यक्ती जिवंत वाटाव्या म्हणून सद्‌गुण-दुर्गुणांची, जय-पराजयांची, सामर्थ्य-दुर्बलतेची समान वाटणी ही धूळफेक करणारी क्लृप्ती आहे! शिवाजी-संभाजी यांचे 'माणूस' म्हणून सामान्यांशी नाते जुळणे याला काडीचीही किंमत नाही. त्यांची व्यक्तित्वे आमच्यापेक्षा फार वेगळी आहेत, भव्य आहेत आणि तरीही त्यांचाच साक्षात्कार आम्हाला ऐतिहासिक कलाकृतीत झाला पाहिजे. वा. ल. कुलकर्णी मानतात त्याप्रमाणे आजच्या सामान्यवर्गातील पिता-पुत्रांमधील संघर्ष आणि शिवाजी-संभाजी यांमधील संघर्ष यांची जातकुळी एक नाही आणि तीव्रता तर मुळीच सारखी नाही. त्या संघर्षाला एक वेगळाच सामाजिक अर्थही आहे. जीवन, व्यक्तिमत्त्व, नाटच, संघर्ष, शोकमयता या साऱ्या बाबतीत शिवाजी-संभाजी यांचे अद्वितीयत्व आणि निराळेपण जाणवणे हेच ऐतिहासिक नाटकाच्या श्रेष्ठत्वाचे गमक आहे. त्या दृष्टीने खऱ्या अर्थाने इतिहासाला जिवंत करण्यात कानेटकर कितपत यशस्वी झालेले आहेत त्याचा विचार करणे आवश्यक आहे.

### 'रायगडला जेव्हा जाग येते' आणि 'छत्रपती संभाजी महाराज'

'रायगडाला जेव्हा जाग येते' हे नाटक संपूर्णपणे श्री. वा. सी. बेंद्रे यांच्या 'छत्रपती संभाजी महाराज' या चरित्रावर आधारलेले आहे. बेंद्रयांनी जशी संभाजीची वकिली केलेली आहे तशीच कानेटकरांनी केलेली आहे. बेंद्रयांनी संभाजी, अष्टप्रधान यांना जे काळे-पांढरे रंग लावलेले आहेत तेच कानेटकरांनीही लावलेले आहेत. बेंद्रयांनी ज्याप्रमाणे बखरकारांना अवमानून परकीय वखारवाल्यांना ईश्वरासमान आणि परमानंदाच्या 'अनुपुराणा' ला वेदासमान मानलेले आहे तसेच कानेटकरांनीही मानलेले आहे. बेंद्रयांनी ज्याप्रमाणे संभाजीच्या जीवनातील घटनांबद्दल दोष शिवाजी, अष्टप्रधान व सोयराबाई यांनी निर्माण केलेल्या परिस्थितीला दिलेला आहे, त्याप्रमाणे कानेटकरांनीही त्यांनाच दोषी ठरवलेले आहे. गडकरी, औंधकर, यांच्यापेक्षा आपणच संभाजी अधिक यथार्थपणे रंगवलेला आहे असा कानेटकरांचा दावा बेंद्रयांच्या ग्रंथाच्या बळावरच आहे. गडकरी-औंधकर यांनी त्यांच्यावेळच्या ज्ञात इतिहासाशी इमान राखूनच वाङमयनिर्मिती केलेली आहे. "वा. सी. बेंद्रे यांनी या सर्व 'शब्दसृष्टीच्या ईश्वरांना' फारच झणझणीतपणे आपल्या ग्रंथात चपराक लगावलेली आहे" असे एका ललितलेखकाने इतर प्रतिभावंतांविषयी उद्‌गार काढणे फारच आक्षेपार्ह आहे. ते प्रतिभावंत काही संभाजीचे वैरी नव्हते. बेंद्रयांप्रमाणे त्यांच्यासाठी ग्रंथ लिहून कोणी आयता आराखडा तयार ठेवलेला नव्हता हा काही त्यांचा

दोष नाही. कानेटकरांच्या संभाजीपेक्षा गडकरी-औंधकराचा उद्दाम, कृतिशूर व पश्चात्तापदग्ध संभाजी अधिक जिवंत आणि खराखुरा वाटतो. नाटकातील प्रमुख प्रसंग उभे करताना कानेटकरांनी कित्येक ठिकाणी इतिहासाचा विपर्यास केलेला आहे.

## संभाजीच्या वर्तनाबद्दल इतरांना दोषी ठरवणे अयोग्य

संभाजीचे व्यक्तिचित्र रेखाटताना कानेटकरांनी इतिहासापेक्षा मार्क्सच्या परिस्थितीवादाचा आणि आधुनिक मानसशास्त्रीय सिद्धांतांचा आश्रय केलेला आहे. मानवी जीवनातील प्रत्येक घटनेला व्यक्ती जबाबदार नसून परिस्थिती आहे हा मार्क्सवादाचा प्रमुख सिद्धांत ! माणसाच्या आयुष्यातील सगळ्या गोष्टींचे स्पष्टीकरण लहानपणी दडपलेल्या भावना, आकांक्षा, प्रेरणा यांच्याच संदर्भातून देणे हे फ्रॉएडच्या मानसशास्त्राचे वैशिष्टच ! या दोन विचारवंतांच्या सिद्धांतांनी माणसाचे आत्मस्वातंत्र्य नष्ट करून त्याला सगळ्या अपराधातून मुक्त केलेले आहे. संभाजीचे चित्र रेखाटताना त्याच्या व्यक्तिवैशिष्टचाचा विचार न करता आधुनिक सिद्धांतांना कानेटकरांनी प्राधान्य दिलेले आहे. संभाजीसारख्या कर्तबगार, मनस्वी व्यक्तींच्या बाबतीत असे आढळते की त्यांचे जीवन परिस्थिती व संस्कार यांपेक्षा त्यांच्या व्यक्तित्वातील काही मूलभूत वैशिष्टयांनीच घडवलेले असते. कर्तबगार व कृतिशूर व्यक्ती परिस्थितीला धुडकावून लावते असाच इतिहासाचा निर्वाळा आहे. परिस्थितीचा व संस्कारांचा परिणाम होणे वा न होणे हे सर्वस्वी व्यक्तीवर अवलंबून आहे. म्हणूनच एका परिस्थितीतील निरनिराळ्या व्यक्तींच्या प्रतिक्रिया वेगवेगळ्या असतात. मराठी बखरकारांनी शूर, व्यसनी, दिलदार, विकाराधीन, कृतिशूर, बेमुर्वतखोर असा संभाजी रंगवलेला आहे. जाणून-बुजून सत्याचा विपर्यास बखरकारांनी केलेला नाही. पण कानेटकरांचा संभाजी आपल्या भावना पिंजत बसतो, मध्यमवर्गातील दीनदुबळ्या मुलासारखा सावत्रपणाने विद्ध होतो, एखाद्या मानसशास्त्रज्ञाप्रमाणे स्वतःचेच मनोविश्लेपण करीत बसतो, कवितेतल्या नायकासारखे निष्क्रिय काव्यमय प्रेम करतो, अष्टप्रधानांशी वैचारिक व वकिली डावपेच लढवण्यात बुद्धी वेचतो आणि सत्ययुगातील सत्त्वशील पुरुषोत्तमाप्रमाणे पित्याची शेवटची आज्ञा प्रमाण मानायला सिद्ध होतो. 'इतिहासाशी संगत' सोडून असा मुखवटा चढवलेला, घासून पुसून चकचकीत केलेला संभाजी कानेटकरांनी उभा केलेला आहे.

## गडकरी-औंधकरांचा संभाजी अधिक जिवंत व यथार्थ–

पुस्तकी विद्या, युद्धकौशल्य, राजकारणनैपुण्य, प्रत्यक्ष जबाबदारीचा अनुभव या सगळ्या दृष्टिकोनातून संभाजीला समर्थ बनवण्याचा जो प्रयत्न छत्रपतींनी केलेला होता त्याचे विस्तृत वर्णन चिटणीसांच्या 'सप्तप्रकरणात्मक चरित्रा'त आहे. परमानंदाच्या 'शिवभारता'तही त्याचा उल्लेख आहे. आयुष्यभर छत्रपतींनी संभाजीसाठी विश्वप्रयत्न केलेले होते. म्हणूनच त्या साऱ्यातूनही संभाजीचे व्यक्तिवैशिष्टच जेव्हा उसळून प्रकट झाले तेव्हा यदुनाथ सरकारांनी 'छत्रपतींचे पूर्वजन्मीचे पाप' या शब्दात त्याचे स्पष्टीकरण दिलेले आहे. छत्रपतींना 'राजांच्या वृत्ती घडवायला सवड मिळाली नाही' ही वस्तुस्थिती नसून आटोकाट प्रयत्न करूनही त्या घडवता आल्या नाहीत हे दारुण सत्य आहे. संभाजीच्या आजूबाजूलाच अशा व्यक्ती होत्या की ज्यांचे व्यक्तित्व त्यांच्या पित्यांनी घडविलेले नव्हते. छत्रपतींकडे शहाजीने कोठे लक्ष दिलेले होते ? राजारामाचे व्यक्तित्व घडवायला छत्रपतींना कोठे अवसर मिळालेला होता ? जिजाबाईने छत्रपतींना घडवले असे मानले तर संभाजीला तिला का घडवता आले नाही? छत्रपती, संभाजी, राजाराम या साऱ्यांचीच व्यक्तित्वे स्वतंत्र आहेत. तेव्हा संभाजीच्या कृत्यांचे खापर भोवतालच्या व्यक्तींवर फोडणे हे सर्वांनाच अन्यायाचे आहे. संभाजीचे चित्र रेखाटताना कानेटकरांनी सावत्रपणाचे बरेच भांडवल केलेले आहे. वयाच्या सतरा वर्षांपर्यंत संभाजी हा जिजाबाईच्या लाडात वाढल्यामुळेच अत्यंत दुराग्रही, आत्मकेंद्रित आणि अहंकारी बनला. छत्रपतींसकट सगळे जिजाबाईसमोर नतमस्तक असल्यामुळे ती जिवंत असेतोपर्यंत संभाजीला सावत्रपणाचा जाच असणे असंभवनीय आहे. वयाच्या सतराव्या वर्षानंतर संभाजीसारख्या कर्तबगार युवराजाला जर सावत्रपणाचा जाच वाटू








लागला तर ते त्याच्या दुर्बलतेचे लक्षण मानावे लागेल. संभाजी दीनदुबळा नव्हता अशी इतिहासाची साक्ष आहे. सरदेसायांनी उद्‌धृत केलेल्या संभाजीच्या एका पत्राचा हवाला कानेटकरांनी दिलेला आहे. एवढ्या महत्त्वाच्या पत्राचा उल्लेख बेंद्रयांच्या ग्रंथात कसा नाही ? सरदेसायांच्या शिवाजीचरित्रात किंवा संभाजीचरित्रात कोठेही मला त्या पत्राचा उल्लेख आढळला नाही. 'शिवकालीन पत्रसंग्रहात'ही ते पत्र नाही. छत्रपतींना विरोध करण्याच्या भूमिकेतूनच संभाजी मोगलांना मिळाला असा निष्कर्ष सरदेसायांनी काढलेला आहे.

## " मज माघारे हे राज्य संरक्षण करणार ऐसा पुत्र दिसत नाही "

प्रत्यक्ष संभाजी कसा होता ? संभाजी फटकळ असला तरी व्यसनी नव्हता असे सभासदबखरीवरून जे विधान बेंद्रयांनी केलेले आहे ते चुकीचे आहे. सभासदाला जे ठाऊक होते तेच त्याने छत्रपतींच्या तोंडी भविष्यरूपाने घातलेले आहे. "मज माघारे हे राज्य संरक्षण करणार ऐसा पुत्र दिसत नाही ...... संभाजी थोर ब्राह्मणांस मारील. थोर लोकांची चाल मोडील. संभाजी कैफ खाईल. गांजा ओढील. इष्कबाजी करील....... खजीना उडवील. " असाच उल्लेख सभासदबखरीत आहे. संभाजीसारख्या शूरवीराला जेव्हा एका तळघरातून शोधून काढून गिरफदार करण्यात आले तेव्हा त्याला भ्याड समजणे न मानवल्यामुळे तो नशेत असावा हा निष्कर्ष बेंद्रयांनी शेवटी मान्य केलेला आहे. संभाजी हा शत्रूशी तोंड देण्याची वेळ आली तरी दुसऱ्यांच्या बायकांशी दुर्वर्तन करीत राहतो असा स्पष्ट आरोप मनुचीने केलेला आहे. संभाजी एक वर्ष मोगलांच्या छावणीत होता. त्यावेळी दिलेरखानाच्या हाताखाली भीमसेन सक्सेना या नावाचा एक तोफखान्यावरचा अधिकारी होता. पन्नास वर्षे त्याचे वास्तव्य महाराष्ट्रात होते. अनेक लढायात व मोहिमात तो जातीने हजर होता. त्याने 'तारीखे दिल्कुशा' या नावाचे आत्मवृत्त फारशीत लिहिलेले आहे. त्यात शिवाजी-संभाजीविषयीचा आपला अभिप्राय त्याने नमूद केलेला आहे. त्याच्या दृष्टीने छत्रपती हे सत्पुरुष, राजनीतिप्रवीण आणि शूर होते व संभाजी चैनी, व्यसनी, गर्विष्ठ, वकूब नसलेला असा होता. अशी पार्श्वभूमी असताना संभाजीचे व्यक्तिचित्र रेखाटण्यासाठी जे प्रसंग कानेटकरांनी उभे केलेले आहेत ते महत्त्वाचे असल्यामुळे त्यांची ऐतिहासिकता पारखली पाहिजे.

## कानेटकरांनी चितारलेल्या प्रसंगांच्या ऐतिहासिकतेची छाननी

नाटकातील पहिलाच समरप्रसंग निर्माण झालेला आहे तो युवराजाचे वर्तन कसे असावे या मुद्यातून ! संभाजी युवराज असल्यामुळे त्याचे बेजबाबदार विलासी षोक छत्रपती, अण्णाजी, सोयराबाई व हंबीरराव यांना मान्य नाहीत. उलट मन मानेल तसे वागायला युवराज स्वतंत्र आहे अशी संभाजीची स्वतंत्र पण बेमुर्वतखोर प्रवृत्ती आहे. युवराजाची जबाबदारी टाळून अधिकार तेवढे भोगायचे ही त्याच्या मनाची ठेवण आहे. भावी राजाकडून आदर्श वर्तनाची अपेक्षा लोकांनी ठेवणे अगदी रास्त आहे. कानेटकरांनी संभाजीच्या व्यसनावर रसिकतेचा बुरखा चढवलेला आहे. कलावंतांची बूज राखणे हे राजाच्या अधिकारातील असताना युवराजाने रसिकतेच्या नावाखाली रंगढंग लपवणे हे अयोग्य आहे. युवराजाने जबाबदारीची बंधने पाळलीच पाहिजेत हा आग्रह अनाठायी नाही. त्यात संभाजीच्या शक्तीबाहेरचे काहीच नव्हते. संभाजी व अण्णाजी यांमधला संघर्ष रंगवताना कानेटकरांनी बेंद्रयांप्रमाणेच संभाजीचे उदात्तीकरण केलेले आहे. आणि अण्णाजी काळ्या रंगाने रंगवण्याचा प्रयत्न केलेला आहे. रयतेशी वागण्याची रीत हा वादाचा मुद्दा आहे. एका परकीय प्रवाशाच्या वृत्तांतावर अंधपणे विश्वास ठेवून हा प्रसंग कानेटकरांनी उभा केलेला आहे. जॉन फ्रायर याने असे लिहून ठेवले की, शिवाजीची प्रजा गुलामगिरीचा अनुभव घेते, कुळांवर वाटेल तसे हिंस्र अत्याचार अधिकाऱ्यांकडून होतात आणि कित्येक ब्राह्मण संभाजीच्या कैदेत असून तापलेल्या सांडसांनी त्यांचा छळ केला जातो. प्रत्यक्ष छत्रपतींनी आपल्या अधिकाऱ्यांना लिहिलेल्या पत्रांकडे दुर्लक्ष करून एका क्षुल्लक परकीयाच्या लिखाणाला वेदवाक्य मानण्यात कानेटकरांनी अलौकिक प्रतिभा व्यक्त केलेली आहे. पहिला प्रश्न असा की छत्रपतींची राज्यव्यवस्था अशी होती का ? रयतेच्या कल्याणाच्या










बाबतीत छत्रपती जागरूक होते, सिद्याच्या लोकांनी छत्रपतींच्या मुलुखातील भातांची शेते कापून नेण्याचा प्रयत्न केला तेव्हा छत्रपतींच्या लोकांनी अचानक छापा घालून शंभर लोकांना ठार केल्याचा उल्लेख पत्रसारसंग्रहात आहे. दाभोळच्या अधिकाऱ्यांना छत्रपतींनी पाठविलेले पत्र तर विशेष प्रसिद्ध आहे. 'रयतेस काडीचा आजार द्यावया गरज नाही' हे त्या पत्रातील मुख्य सूत्र ! 'सैनिकांनी गावकऱ्यांना व शेतकऱ्यांना त्रास देता कामा नये, त्यांना मोगलाई बरी वाटेल अशी अधिकाऱ्यांची वर्तणूक असता कामा नये, सगळे जिन्नस विकत घेतले पाहिजेत, हलगर्जीपणामुळे गवताच्या गंजी जळणार नाहीत अशी खबरदारी घेतली पाहिजे 'अशा ज्या सूचना छत्रपतींनी दिलेल्या आहेत त्यातून त्यांची प्रजाहितदक्षता प्रकट झालेली आहे. चाफळच्या श्रीरामजन्मोत्सवाला चोर, लुटारू, व सैनिक यांच्यापासून त्रास होणार नाही अशी व्यवस्था ठेवण्याची आज्ञा छत्रपतींनी एका पत्रातून दिलेली आहे. कानेटकरांचे छत्रपती मात्र रयतेचा छळ व्हायचाच असे गृहीत धरून चालतात ही आश्चर्याची गोष्ट आहे. शिवाजीपेक्षा संभाजी अधिक सहृदय व दयाळू आहे असे इंग्रजांनी सवलती जास्त मिळाल्या मुळे, स्वार्थी बुद्धीने आणि आमच्या श्रद्धाळू भारतीय लेखकांनी ते शिरोधार्य मानले. (पण 'शिवाजीचेच धोरण संभाजी पुढे चालू ठेवीत आहे' असेही जॉन फ्रायरने लिहून आमची इंग्रजश्रद्धा अडचणीत टाकलेली आहे.) अष्टप्रधानांना वतने जहागिरी नसल्यामुळे करवसुलीसाठी आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करण्याची वृत्ती त्यांच्यामध्ये निर्माण होऊ शकली नाही. शिवकालातील कोणत्याही महत्त्व पावलेल्या व्यक्तीने आपल्या वंशजासाठी अमाप पैसा ठेवला नसल्याचे न्या. मू. रानडयांनीही लिहून ठेवलेले आहे. अधिकाराविषयीचा वाद हा संभाजी व प्रधानमंडळ यांमधील संघर्षाचा दुसरा मुद्दा आहे. युवराज हा फक्त भावी राजा असतो. त्यापलीकडे राज्यकारभारात ढवळाढवळ करण्याचा त्याला अधिकार नसतो. या दृष्टीने छत्रपतींचे 'आज्ञापत्र' महत्त्वाचे आहे. छत्रपतींच्या राजनीतीविषयी रामचंद्रपंत अमात्य लिहितात, "प्रधान म्हणजे राज्यलक्षण गृहाचे स्तंभ आहेत.... प्रधानापेक्षा राजे लोकांस इतर आप्त व अधिकोत्तर किमपि नाही.... सकल सेवकांपेक्षा प्रधानांचा बहुमान विशेष आहे... प्रधानच राजबंधू. ...लाक्षणिक प्रधान पाहून करावे. त्यांवर संपूर्ण राज्यभार ठेवावा. ... त्यांची भीड सर्वांपेक्षा अधिकोत्तर वागवावी. त्याची भीड नाही. तेव्हा त्याचे म्हटले कोण ऐकतो ? त्याचे म्हटले कोण ऐकत नाही, तेव्हा यथोचित राज्यकारभार कसा चालतो ? .... संपूर्ण राज्यभार देशदुर्गाचा अखत्यार सरकारकुनाचे हाती द्यावा. सेनानायक त्या आधीन करावे." राजाच्या बाबतीत प्रजाबलाच्या खालोखाल अमात्यबलाची महती महाभारतात गाइलेली आहे. अमात्यसंस्था सुरळित चालू असेल तर राज्य व्यवस्थित चालते हे छत्रपतींना ठाऊक होते. पण बेंद्रेचांनी व कानेटकरांनी त्याची दखल न घेता संभाजीचे उदात्तीकरण करून अष्टप्रधानांना दोषी ठरवलेले आहे. कानेटकरांनी नाटकातील समरप्रसंग त्रयस्थपणे न रंगवता संभाजीचे समर्थन करण्यासाठी उभे केलेले आहेत. संभाजीच्या आज्ञेने लिहिलेल्या संस्कृत काव्यात परमानंदाने जरी अष्टप्रधानांना स्वार्थी, कावेबाज, दुर्मंत्री म्हटलेले असले तरी इतिहास असे सांगतो की छत्रपतींचा संभाजीपेक्षा प्रधानमंडळावर अधिक विश्वास होता. शत्रूंच्या गोटातील गुप्त वार्ता मिळविणाऱ्या छत्रपतींना अठरा वर्षेपर्यंत आपल्या प्रधानांची ओळख पटली नाही असे होणे सर्वस्वी अशक्य आहे. "ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करतो ?" असली न्यायनिष्ठुर वृत्ती छत्रपतींची होती. नेमून दिलेल्या कार्यात हलगर्जीपणा केल्याबद्दल छत्रपतींनी नेताजी पालकराचे सेनापतीपद काढून घेतलेले होते. प्रधान दुष्ट असते तर त्यांच्याही बाबतीत तेच झाले असते. पण कर्नाटकाच्या स्वारीवर जाताना राजधानीतील मुख्य कारभार त्यांनी अण्णाजी दत्तोवर सोपवला आणि संभाजीला प्रभावळीचा सुभेदार म्हणून शृंगारपूरला धाडले. संभाजीची प्रधानमंडळाशी जी तेढ होती त्याच्यामागे प्रजेविषयीचा कळवळा वगैरे काही नसून दुर्दम्य अहंकार आणि अधिकारासबंधी बेजबाबदार जाणीव होती. संभाजी फार आत्मकेंद्रित असल्यामुळे शिवशाहीचे स्वरूपच त्याला समजू शकले नाही.



अनुक्रमणिका







## संभाजीवरचा आळ आणि बेन्द्रे यांची 'कागदोपत्री पुराव्याची' अपेक्षा !

नाटकाच्या दुसऱ्या अंकातील संभाजीवरचा आळ हा एक अटीतटीचा समरप्रसंग आहे. इतिहासाने तो संशयित मानला म्हणून आपणही तो संशयित ठेवला असा कानेटकरांचा दावा आहे. इतिहासाने तो आळ संशयित मानलेला आहे का? संभाजीच्या दुर्वर्तनासंबंधी मनुचीने लिहून ठेवलेले आहे. छत्रपतींच्या मृत्यूची अफवा पसरलेली असताना, "शिवाजीच्या एका मुख्य ब्राह्मणाच्या मुलीशी संभाजीने व्यभिचार केला.... त्याचा कडेलोट करण्याचा हुकूम शिवाजीने दिल्याचे ऐकून संभाजीने त्याला विषप्रयोग केला असे कित्येक बोलतात" असे मुंबईच्या वखारवाल्याने १७ जाने. १६७६ च्या पत्रात लिहिलेले आहे. शिक्षेच्या भीतीने संभाजी मोगलांकडे पळून गेला हे खरे मानून, त्याच्या अगोदर संभाजी एक वर्ष रायगडावर नसल्यामुळे संभाजीवरचा आळ खोटा आहे असे बेंद्रयांनी मानलेले आहे. पण संभाजी शकावलीप्रमाणे इ. स. १६७६ मध्ये संभाजी रायगडावरच होता आणि २१ ऑक्टो. १६७७ या दिवशी तो शृंगारपूरला जाऊन राहिला. म्हणजे व्यभिचाराचा आरोप झाला तेव्हा संभाजी रायगडावरच होता. 'शंभूराजे दुर्वृत्त जाले. त्यावरी इतराजी जाली. शृंगारपुरास ठेवले" अशी शकावलीतील नोंद कानेटकरांनीच दिलेली आहे. हळदीकुंकवाच्या समारंभासाठी आलेल्या एका सुवासिनीला महालात नेऊन बलात्कार केल्याचा उल्लेख चिटणीसांच्या 'सप्तप्रकरणात्मक चरित्रा'त आहे. रायगडावर सती गोदावरीचे वृंदावन आजही अस्तित्वात आहे. कोकणची ऐतिहासिक दंतकथा असे सांगते की संभाजीला पश्चात्तापाचे शासन करण्यासाठी त्याच्या हाताने आपल्या चितेला अग्नी देण्यात यावा अशी इच्छा सतीने छत्रपतींसमोर प्रकट केलेली होती. म्हणूनच दुसरी कोणतीही शिक्षा छत्रपतींनी संभाजीला दिलेली नसावी. अशाच अपराधासाठी यशवंतराव शिवतरकर याला छत्रपतीच्या आज्ञेप्रमाणे कठोर शासन केल्याचा उल्लेख पत्रसारसंग्रहात आहे. छत्रपती अपत्यप्रेमाने हतबल झालेले असणेही त्यांच्यामधील 'माणसा'ला धरूनच आहे.; बलात्कारासारख्या आरोपाच्या बाबतीत बेंद्रे कागदोपत्री पुराव्याची अपेक्षा करतात ही आश्चर्याची गोष्ट आहे. असल्या गोष्टी राजकीय कागदपत्रात असणार नाहीत ही उघड गोष्ट आहे. कानेटकरांचा हंबीरराव प्रत्यक्ष कोणी पाहिले आहे की काय अशी विचारणा करतो हे तर अधिकच आश्चर्यकारक आणि चमत्कारिक आहे. ज्या गोष्टी लपून छपून केल्या जातात त्याबाबतीत प्रत्यक्ष किंवा कागदोपत्री पुराव्याची अपेक्षा करणे सर्वस्वी चुकीचे आहे. शिवाय बलात्काराचा आरोप निरनिराळ्या व्यक्तींनी फक्त संभाजीच्या बाबतीतच केलेला आहे, इतर कोणाच्याही बाबतीत नाही ही वस्तुस्थिती बेंद्रयांनी आणि कानेटकरांनी लक्षात घेतलेली नाही. कानेटकरांनी 'शक्यता' गृहीत धरून त्या प्रकरणावर काव्यात्मकतेचा साज चढवलेला आहे. कथा-कादंबऱ्यातील ठोकळेबाज प्रियकरांप्रमाणे कानेटकरांचा संभाजी म्हणतो, "प्रसंग येता तर छातीचा कोट करून आम्ही अलम दुनियेचे वार झेलले असते. आणि तिला आमच्या मायेची ऊबच दिली असती. थोडी धिटाई दाखवून ती नुसता हात पुढे करती तरीदेखील तो हात हाती घेण्यासाठी आम्ही आभाळाशीदेखील टक्कर घेतली असती." जणू काही राक्षसी समाजरुढीपुढे दोन प्रेमिक अगतिक बनलेले आहेत. इतिहासाची संगत सोडली म्हणजे असली अनैतिहासिक हास्यास्पद समर्थने करावी लागतात. संभाजी आणि त्याची प्रेयसी हे दोघे एकमेकांवर अनुरक्त असते तर शिवकालीन समाजाला त्यात गैर काहीच वाटले नसते. त्या स्त्रीला अग्निप्रवेश करावाच लागला नसता. भोसल्यांच्या वंशात शहाजीपासून छत्रपतींसकट साऱ्यांचेच विवाहबाह्य संबंध होते. आणि अशा अनौरस संततीची व्यवस्थाही केली जात असे. राजे-सरदारांचे संबंध त्यावेळच्या समाजाला मान्य होते. त्यासाठी छातीचा कोट करण्याची काहीच जरूरी नव्हती. कानेटकरांनी जे 'संशयित' मानले ते संभाजीच्या बाजूने पक्षपातीपणाने 'स्पष्ट' केलेले आहे. एका निष्ठावंत प्रियकराच्या वृत्तीच्या तलम आवरणाखाली संभाजीची जबरदस्ती व त्याचा बदफैलीपणा दडवण्याचा कानेटकरांनी प्रयत्न केलेला आहे. हे दडवण्यासाठी आणखी एक वेगळाच तिढा








कानेटकरांनी निर्माण केलेला आहे. कानेटकरांचा संभाजी जाहीरपणे आरोपाची चौकशी होता कामा नये असा कांगावा करतो. ज्याला कर नाही तो संभाजी असा जाहीर चौकशीला डरतो. एखाद्या दुबळ्या मुलाप्रमाणे पित्याकडून सहानुभूतीची अपेक्षा करतो. अत्यंत आज्ञाधारक मुलाप्रमाणे 'आपण द्याल ती सजा भोगण्यास आम्ही सिद्ध आहोत!' असे म्हणून सात्त्विक संतापाने चालता होतो. वाटेल ती आज्ञा प्रमाण मानायला संभाजी म्हणजे सूर्यवंशातील रामचंद्र नव्हे. कानेटकरांचा संभाजी आज्ञापालनाचा वहाणा करतो आणि सज्जनगडावर जाऊन राहण्याची छत्रपतींची आज्ञा असताना स्वराज्यद्रोह करून मोगलांकडे जातो. 'आपण कलावंतिणीला काय विदागी दिली असती?" असा सवाल करून पित्याचा अवमान करणारा संभाजी, पित्यावरच्या निष्ठेमुळे नव्हे तर शहाण्या बायकोच्या सूचनेवरून पित्याची क्षमा मागायला सिद्ध होतो. थोरल्या मासाहेबांशिवाय कोणासमोरही मान लववणार नाही अशीही उर्मट गर्जना तो 'आज्ञाधारक' संभाजी करतो. छत्रपतींनी सोपवलेली प्रभावळीची सुभेदारीदेखील या आज्ञाधारक' पुत्राने केवळ 'बायकोच्या शब्दाखातर' स्वीकारली! कानेटकरांचा संभाजी नुसता भावपूर्ण शब्दांची आतषबाजी करतो. ज्याला केवळ वडिलांचा धाकच ठाऊक आहे तो संभाजी सरळसरळ स्वराज्यद्रोह अगदी सहजपणे करतो ही आश्चर्याची गोष्ट आहे.

## संभाजीचा स्वराज्यद्रोह

संभाजीच्या स्वराज्यद्रोहाचे समर्थन करणे वेंद्रचांनाही फार जड गेलेले आहे. मोगलांच्या साहाय्याने छत्रपतींचे राज्य जिंकून स्वतः छत्रपती होण्याची संभाजीची महत्त्वाकांक्षा होती. 'परत येईन तो सह्याद्री जिंकायलाच!' असा अहंकारपूर्ण उद्धट निरोप त्याने छत्रपतींना पाठवल्याचे परमानंदाने लिहिले आहे. अहंकार व अधिकारलालसा यांनी प्रेरित होऊनच संभाजी अविचाराने मोगलांना जाऊन मिळालेला होता. याही ठिकाणी कानेटकरांनी संभाजीचा साळसूदपणा रंगवण्याचा प्रयत्न केलेला आहे. नाटकातील संभाजीने 'छत्रपतींच्या मुलुखाला हात लावायचा नाही' असा दिलेरखानासारख्या 'सज्जनाशी' सालस पण बालिश करार केलेला आहे. संभाजीच्या वर्तनाला सफेती लावण्याचा हा प्रकार आहे. संभाजीने दिलेरखानाशी गुप्त पत्रव्यवहार केलेला होता. मोगलांच्या मोहिमेत ते संभाजीला जाणूनबुजून अग्रभागी ठेवीत असल्याचा उल्लेख वखारवाल्यांच्या पत्रात आहे. दिलेरखानाच्या सैन्याने जेव्हा भूपाळगडावर हल्ला केला तेव्हा स्वतः संभाजीने गडकरी फिरंगोजी नरसाळा याला गड निमूटपणे ताब्यात देण्याची आज्ञा केलेली होती. युवराज समोर असल्यामुळे त्याने तोफांचा भडिमार न करता गड मोगलांच्या स्वाधीन केला. नाटकातील संभाजी म्हणतो त्याप्रमाणे केवळ त्याच्या नावाचा उपयोग केलेला नव्हता. त्यावेळी स्वतः संभाजी सैन्याच्या अग्रभागी होता. छत्रपतींना नंतर हे समजल्यावर त्यांनी सगळ्या किल्लेदारांना असा कर्तव्यकठोर आदेश पाठविला की युवराज समोर असला तरी तोफांचा भडिमार करण्यास कचरू नये. संभाजीच्या एकेका कृत्यापुढे छत्रपतीदेखील व्यथित आणि अगतिक बनत गेले. शत्रूला मिळालेल्या संभाजीला परत आणण्याचे प्रयत्न त्यांनी सतत चालवलेले होते. परत आलेल्या अपराधी संभाजीचीही प्रेमळपणे समजूत शिवरायांनी घातली. प्रत्येक खेपेला छत्रपतींनीच संभाजीला सांभाळून घेतले.

## नाटकातील शेवटचा प्रसंग अनैतिहासिक

नाटकातील शेवटचा प्रसंगही इतिहासाला सोडून आहे. संभाजीने सैन्यबळावर अष्टप्रधानांचा विरोध मोडून काढून राज्यपद मिळवलेले होते. नाटकातील संभाजी मात्र पित्याची शेवटची इच्छा कळावी म्हणून तडफडताना दाखवलेला आहे. या प्रसंगात राजारामासारख्या एका दहा वर्षांच्या मुलाला राबवण्यात आलेले आहे. हा राजाराम वाटेल त्या गोष्टी करू शकतो. त्याने भलतीच मोठी जबाबदारी अगदी लीलेने पार पाडली. त्याने छत्रपतींचा प्रत्येक शब्द लक्षात ठेवलेला आहे, अण्णाजीसारख्या मुत्सद्यालाही तो दमदाटी करतो. छत्रपतीपेक्षाही छत्रपतींचा हा छोटा मुलगा अद्‌भुत कार्य पार पाडतो. राजारामाच्या द्वारे गुंता सोडवण्याचा कानेटकरांनी केलेला प्रयत्न









अनुक्रमणिका

हा या नाटकातील सर्वात कच्चा दुवा आहे. संभाजीचा नसलेला मोठेपणा रंगवण्यासाठी त्यांना असला असभवनीय व विक्षिप्त द्राविडी प्राणायाम करावा लागला. छत्रपतींची शेवटची इच्छा 'संशयित' असताना कानेटकरांनी ती स्पष्टपणे रंगवलेली आहे आणि 'स्पष्ट' पणे संभाजीने बळाने राज्यपद मिळवलेले असताना त्या घटनेचा संभाजीच्या बाजूने विपर्यास केलेला आहे. नाटकातील या महत्त्वाच्या प्रसंगातून स्वभावचित्रणावर प्रकाश पडत असल्यामुळे त्यांच्या ऐतिहासिकतेचा विचार करणे मला अत्यंत आवश्यक वाटले. कोणत्याही ललितकलाकृतीला इतिहासाचा असा विपर्यास करता येणार नाही.

## दुय्यम पात्रांवरही अन्याय :

### पंतप्रधानांचे विडंबन

'रायगडाला जेव्हा जाग येते' या नाटकात दुय्यम पात्रांवर अन्याय झालेला आहे. मोरोपंत पिंगळ्यांना जाणून बुजून खुजे, कणाहीन बनवलेले आहे व अण्णाजी दत्तोंना स्वार्थी, दीर्घद्वेषी, अप्रामाणिक ठरवलेले आहे. युद्धकौशल्य आणि राजकारणकौशल्य या दोन्ही दृष्टींनी मोरोपंत श्रेष्ठ होते असा इतिहासाचा कौल आहे. कानेटकरांचे पंत निर्बुद्ध, भित्रे व कणाहीन आहेत. 'औरंगजेब कोणता मोहरा खर्ची घालील ?' असा सवाल छत्रपतींनी केल्यानंतर अठरा वर्षे पंतप्रधानकी सांभाळणारे पंत संचित होऊन विचारात पडतात. 'आलमगीर दक्षिणेत येईल' म्हटल्यानंतर त्यांना विस्मयाचा जबरदस्त धक्का बसतो. 'दिल्लीपतीच्या अफाट सामर्थ्याला टक्कर देण्यासाठी आपण अफाट अस्त्राची योजना केलेली आहे' हे छत्रपतींचे उद्गार ऐकल्यानंतर पंत पुनः मठ्ठ विद्यार्थ्याप्रमाणे बुचकळ्यात पडतात. औरंगजेबाच्या मुलाला फितवण्याचा विचार महाराजांनी बोलून दाखवल्यानंतर त्यांच्या चातुर्याने पंत कमालीचे आश्चर्यचकित होतात. 'संभाजीलाच मोगलांनी फितवले तर ?' अशी शंका छत्रपतींनी प्रकट केल्याबरोबर पंतांचा भीतीने थरकाप होतो. संभाजीला फितवून नेईपर्यंत आपण गाफील राहणार नसल्याचे आश्वासन छत्रपतींनी दिल्यानंतर पंतांचा जीव भांड्यात पडतो आणि ते लहान मुलाप्रमाणे आनंदाने हसायला लागतात. पंतप्रधान की पंतप्रधानाचे विडंबन ? छत्रपतींच्या पंतप्रधानाची अशी रेवडी उडवण्याएवढी प्रतिभा आजपर्यंत कोणीच दाखवलेली नव्हती. मोठमोठ्या मोहिमा यशस्वी करणारे झुंजार पंत उपरण्यात हात बांधून लाचार बनल्याचे दाखवले आहे. खरेखुरे पंत कानेटकरांना रंगवता आलेले नाहीत.

## अण्णाजी कसे होते ?

अण्णाजीला आपण खलपुरुष म्हणून रंगवलेले नाही असे कानेटकर म्हणतात. पण नाटकातील अण्णाजी नेहमी खवचटपणे बोलतात, संभाजीविषयी आकस दाखवतात आणि शेवटच्या प्रसंगात खोटे बोलून कातडी बचावण्याचा प्रयत्न करतात. प्रत्यक्षातले अण्णाजी कसे होते ? इ. स. १६६२ पासून अण्णाजी छत्रपतींच्या प्रधानमंडळात होते. बेंद्रयांनी म्हटल्याप्रमाणे ते स्वार्थी, कावेबाज, कारस्थानी असते तर ते इतका दीर्घकाळ छत्रपतींच्या प्रधानमंडळात राहिले नसते. 'ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करतो ?' असली जरब निर्माण करणारे छत्रपती अण्णाजींची कारस्थाने कशी सहन करतील ? आपल्या अधिकाऱ्यांना त्यांनी वेळोवेळी ताकीद दिलेली आहे. बेंद्र्यांनी अण्णाजीना खलपुरुष केले म्हणून कानेटकरांनीही त्यांना कावेबाज व कारस्थानी बनवले. अण्णाजींनी शिवकालात जमीनमहसुलाच्या पद्धतीत सुधारणा घडवून आणली. त्यांचे छत्रपतींवर वजन असल्यामुळे त्यांची मर्जी राखणे राजापूरच्या वखारवाल्यांना आवश्यक वाटले. त्याचा योग्य तो मान ठेवण्याच्या आज्ञा वखारवाल्यांनी आपल्या अधिकाऱ्यांना दिलेल्या आहेत. ते कर्तव्यनिष्ठ होते म्हणूनच छत्रपतींवर त्यांचे वजन होते. आणि युवराजासमोर त्यांनी लाचारी पत्करली नाही. अठरा वर्षे त्यांचे जवळून निरीक्षण करणाऱ्या छत्रपतींनी संभाजीपेक्षा त्यांच्यावरच अधिक विश्वास ठेवला. त्यांच्या राज्यकारभारकौशल्याची खात्री होती म्हणूनच कर्नाटकाच्या स्वारीवर जाताना छत्रपतींनी रायगडाची व्यवस्था त्यांच्याकडे सोपवली. अण्णाजींनी नंतरच्या काळात राजारामासाठी फक्त संभाजी



अनुक्रमणिका








या व्यक्तीशी द्रोह केला. पण संभाजीने तर एका श्रेष्ठ राजपुरुषाशी– प्रत्यक्ष पित्याशीच –केवळ अधिकारलालसेने द्रोह केलेला होता. राजाराम हाच योग्य वारस वाटल्यामुळे त्याच्याशी अण्णाजींनी जातिवंत इमान राखले. छत्रपतींचे राज्य लुबाडण्याचा अण्णाजी-पंतांनी स्वार्थी विचार केला नाही हे लक्षात घेणे फार जरूरीचे आहे. छत्रपतींच्या परंपरेत वाढलेले कर्तव्यनिष्ठ राजकारणधुरंधर अण्णाजी कानेटकरांना रंगवता आलेले नाहीत. कडव्या निष्ठांच्या संघर्षातील तीव्र नाटच कानेटकरांनी हेरलेले नाही, असेच म्हणावे लागते.

## छत्रपतींच्या रेखाटनातील यश

छत्रपतींचे व्यक्तिचित्र रेखाटण्यात मात्र कानेटकरांनी अपूर्व यश मिळवलेले आहे. खरे उत्कट नाटच आहे ते शिवरायांच्याच जीवनात. प्रतिभेची खरी कसोटी तेथेच आहे. छत्रपतींच्या जीवनातील शोकात्मिकेचे दर्शन घडवण्यात कानेटकर यशस्वी झालेले आहेत. छत्रपतींचे अष्टपैलू व्यक्तिमत्त्व आणि त्यांच्या जीवनातील उदात्तकरुण नाटच कानेटकरांनी समर्थपणे प्रकट केलेले आहे. 'छावे जंगलाकडे धाव घ्यायचेच' असे म्हणणारे छत्रपती साहसाचे व तडफदारपणाचे पुरस्कर्ते आहेत, 'जाताना वर्दी द्यायची राहून गेली तर आल्याबरोबर राणीसाहेबांच्यापुढे दिलगिरीचे दोन शब्द बोलून मोकळं व्हायचं' अशी संभाजीला सहजपणे सूचना देण्यात छत्रपतींची मनुष्यस्वभावाची पारख व्यक्त झालेली आहे. राजकारणातील किंवा कौटुंबिक क्षेत्रातील वाटेल त्या पेचप्रसंगातून बाहेर पडण्याचे अद्वितीय कसब त्यांच्या ठिकाणी आहे. त्यांची वाणी एकाच वेळी माधुर्य आणि कर्तव्यनिष्ठुरता प्रकट करते. 'राज्य करायचं म्हणजे माणसं राजी राखावी लागतात, हळूहळू त्यांना आकार द्यावा लागतो' असे उद्‌गार काढणाऱ्या छत्रपतींच्या ठायी विधायक द्रष्टेपणाही आहे आणि व्यवहारधर्माची जाणही आहे. युवराजाला शिस्त लावण्यात ते जितके निग्रही आहेत तितकेच त्याला प्रत्येक प्रसंगात सावरताना ते हळुवार बनलेले आहेत. पदोपदी घसरणाऱ्या मुलाकडे त्यांनी कधी पाठ फिरविली नाही. स्वराज्यद्रोहाने भाजून निघालेल्या संभाजीला त्यांनी घरोब्याच्या प्रेमळ समजुतीची मलमपट्टी केलेली आहे. आपल्या शब्दांना विखार तर चिकटलेला नाही ना या कल्पनेने ते व्याकूळ बनलेले आहेत. पुत्राचा विश्वास आणि स्नेह आपल्याला मिळवता आला नाही या जाणिवेने त्यांचे पहाडी अंतःकरण विदीर्ण झालेले आहे. मुलाला घडवण्याच्या बाबतीत पदोपदी अपयश येत असतानाही त्यांनी आपली उमेद खचू दिली नाही.

छत्रपतींच्या जीवनातील उत्कट शोकात्म नाटच कानेटकरांनी प्रभावीपणे प्रकट केलेले आहे. साऱ्या राष्ट्राचा विश्वास संपादन करणाऱ्या छत्रपतींना आपल्या मुलाचा स्नेह मिळवता आला नाही. संभाजी म्हणजे छत्रपतींना काळाने दिलेले एक जळजळीत आव्हान आहे. ज्या गोष्टींचा छत्रपतींना तिटकारा होता त्याच गोष्टी आपल्या मुलाच्या हातून घडलेल्या त्यांना पाहाव्या लागल्या. यवनस्त्रीही मातेसमान मानणाऱ्या छत्रपतींच्या मुलाने एका कुलस्त्रीवर अन्याय केला. निष्ठेने आणि पराक्रमाने स्वराज्य उभे करणाऱ्या छत्रपतींच्या मुलानेच प्रथम त्यावर स्वराज्यद्रोहाचा घणाघाती प्रहार केला. अखंड सावधानता बाळगणाऱ्या छत्रपतींचा छावा मोगलांनी फितवून नेल्याची नाचक्की त्यांना निमूटपणे सहन करावी लागली. सगळे जग राजी राखणाऱ्या छत्रपतींच्या मुलाला आपल्या पित्याला देखील राजी राखता आले नाही. शून्यातून विश्व निर्माण करणाऱ्या शिवरायांना आयुष्याच्या अखेरीला आपले सगळेच कर्तृत्व शून्यवत वाटू लागले. आपण रोवलेल्या रोपट्यावर डोळ्यादेखत कीड पडलेली आणि वाढत चाललेली असहायपणे पहाण्याचे दुर्भाग्य त्यांच्या वाट्याला आले. शिवाजींना प्रतिशिवाजी निर्माण करता आला नाही हे छत्रपतींच्या हृदयातील फार मोठे शल्य आहे.

छत्रपतींच्या जीवनातील हे उदात्तकरुण नाटच कानेटकरांनी पूर्णपणे हेरलेले आहे आणि समर्थपणे रंगवलेले आहे. इतिहासाची संगत न सोडता हे भव्य नाटच कानेटकरांनी चित्रित केले असते तर 'रायगडला जेव्हा जाग येते' ही एक श्रेष्ठ कलाकृती ठरली असती !

---








श्री. श्री. रा. टिकेकर

# पानिपत संग्राम (१७६१)

## — * दोन महत्त्वाचे ग्रंथ

मराठे-गिलचे यांचा पानिपतावर प्रचंड संग्राम झाला. तो भारतीय इतिहासाला कलाटणी देणारा ठरला. त्याची द्विशताब्दीची आठवण म्हणून काही ऐतिहासिक साहित्य प्रसिद्ध झाले. त्यापैकी दोन महत्त्वाच्या ग्रंथांखेरीज इतर प्रकाशनांचा परामर्श नवभारत (ऑगस्ट १९६१) मध्ये संपादकीय आदेशानुसार घेतला होता. उरलेल्या दोन ग्रंथांचा परिचय आता-इतक्या कालावधीनंतर करून द्यावा लागतो. पण उशीरा का होईना तो परिचय करता आला-'नवभारत' मधूनच करता आला हीच समाधानाची गोष्ट होय.

सांगली पत्रव्यवहार हा साधन-ग्रंथ, अनेक संकटातून पार पडल्यानंतर हाती आल्यामुळे त्याचा मान आधीचा. पंजाब युनि० चा खंड इंग्रजी आहे, विवेचनात्मक आहे-म्हणून तो नंतर घेतला. ह्या अशा ग्रंथात तर-तम प्रतवारी लावण्याचा प्रयत्न एवढ्या क्रमावरून होऊ नये.

१

सांगली पत्रव्यवहार हा वास्तविक साधनग्रंथ. राजेसाहेबांच्या दप्तरखान्यात पानिपतकालीन सापडलेली ११ पत्रे छापून होत असताना आणखी ३२ पत्रे हाती आली. मिळून ४३ पत्रांचा हा छोटा संग्रह. पण तो छापून प्रसिद्ध होण्यास मात्र "सत्राशे साठ" अडचणी आल्या. प्रा. प. म. लिमये यानी पहिल्या ९ पत्रांची जुळणी केली. पुस्तक प्रसिद्ध होण्यापूर्वीच ते देवाघरी गेले! (जाने० १९६१) टीपा-टिपणे लिहिण्याचे श्री. शंकरराव जोशी यानी पत्करले. तदुत्तर पानिपत युद्धाची कारण-कार्य-परिणाम-मीमांसा ते लिहीत असता "परिणाम" लिहिण्याचे काम मागे ठेवून शंकररावही कैलासवासी झाले (ता. २९ मार्च १९६४). ह्या ग्रंथाबद्दल मूळपासून आस्था दाखवून तो छापण्याची सर्व व्यवस्था करणारे राजे-सांगलीकर पटवर्धनही अचानकपणे स्वर्गवासी झाले!! (ता. २३ फेब्रु० १९६५) ह्या "कालखंडणी" मुळे पुस्तक प्रकाशनास विलंब लागला. उशीरा का होईना, पण हा साधनग्रंथ हाती आल्याबद्दल समाधान वाटावे इतक्या महत्त्वाचा तो आहे.

"नाना फडणीस यांच्या शब्दात पानिपतचा रण-संग्राम" असे सांगलीच्या साधनसंग्रहास नाव दिले, तेव्हा फक्त फडणीस नानांनी लिहिलेली पत्रे हाती आली होती. एकूण ४३ पत्रांपैकी पेशवा नानासाहेबांची १४, नाना फडणिसांची १३, सदाशिवराव भाऊंची ८ आणि इतर ८ अशी विभागणी होते. स. १७५०–७४ असा दीर्घकाल या पत्रांचा असला तरी स. १७६० मधली २८ आणि स. १७६१ मधली ८ अशी ती असल्याने पानिपतप्रकरणी त्यांचे महत्त्व फार मोठे आहे. मेणवली दप्तरांतील पत्रांच्या या नकला असल्या तरी अस्सल कागदांचे महत्त्व त्यांस आहे. कित्येक पत्रांना इतर स्वतंत्ररीत्या प्रसिद्ध झालेल्या कागदांचा पाठिंबा मिळतो.

ही सर्व पत्रें संपादण्याचे कौशल्य शंकरराव जोशांचे. पत्र कोणाचे-कोणास-कोठून केव्हा... या माहितीची मांडणी त्यांनी प्रथम केली. मिती-तारीख (इसवी आणि सुहूर सनाची) पैवस्तीची तारीख दिली. पत्राचा सारांश सांगितला. संबंधित घडामोडींचा उल्लेख केला आणि मग पत्र छापले. पत्रातील निर्देशाच्या खुलासेवजा टीपा दिल्या, आणि पत्र "बालबोध" होईसे केले. असले कागदपत्र वाचण्यासाठी तरबेज वाटाड्याची

* परीक्षणात्मक :

१. पानिपतचा रणसंग्राम (सांगली दप्तरांतली पत्रे) सांपा. : प्रका० गो. ज. कुंटे. सांगली सं. शं. ना. जोशी पृ. २३४ : : रु. १५

२. मराठाज् अँड पानिपत (पंपा.) प्रका० पंजाब युनिव्हर्सिटी. चंडीगढ सं. डॉ. हरिराम गुप्ता पृ. ३७४ : : रु. २०



अनुक्रमणिका

निकड कशी व किती वाटते हे प्रत्यक्ष अनुभवाने समजून घ्यावे. पत्रातली भाषा एकदम कळत नाही. वाक्य संपले कुठे ते समजत नाही. म्हणून मतलब उमगण्यास अडचण पडते.

**सां. पा.** मधील पृ. १-९१ ह्या पत्रव्यवहाराने व्यापिली आहेत. नकला, टीपा यांचा खुलासा पृ. ९१-९८ पर्यंत असून पृ. ९९ वर पत्रांचा तक्ता आढळतो. तारीखवारीने पत्रे छापता आली नाहीत म्हणून ह्या तक्त्यात तो क्रम पाळला. पत्र कोणी, कोणास, कोठून लिहिले, ही माहितीही पुरविली. आणि मग "युद्ध-कारण-मीमांसेस प्रारंभ झाला (पृ. १०१-३२) काही पूर्व लेखक, फार्सी साहित्याचा मराठी अनुवाद, यांची माहिती सांगून अब्दालीच्या हिंदुस्थानावरील मोहिमांची कारणे शोधली. दिल्ली राखण्याची जबाबदारी मराठ्यांनी "अहदनाम्या" नुसार पत्करली. तिला उद्देशून शंकरराव जोशी म्हणतात : "शिवाजीराजे आदिलशाही वाचवितात व पेशवे मोगल पातशाही वाचवितात" (पृ. १२२). हे साम्य आहेसे वाटत नाही.

युद्धकार्य मीमांसा (स. १३३-२३४) ही पुरी झाली नाही. पानिपत युद्धाची खरी सुरवात ता. ९ जाने. १७६० पासून बुराडीच्या लढाईने झाली असे मानून शंकरराव जोशांनी विवेचन केले-पण ते पुरे झाले नाही.

## कारभाऱ्यांची कारवाई

ह्या ग्रंथाच्या आरंभी श्री. म. दा. साठे यानी शंकरराव जोशी यांचे अल्पचरित्र मोठ्या आत्मीयतेने सांगितले आहे. (पृ. १-१६) नवनालंदा महाविहाराचे अध्यक्ष आणि दरभंगा संस्कृत विश्वविद्यालयाचे उपकुलपती ऑन. कर्नल श्री. श्रीधरराव सोहोनी, आय. सी. एस्. यानी प्राक्तकथनात (पृ. १-५) पानिपतचे महत्त्व, मराठ्यांची तत्त्वनिष्ठा, आजपर्यंतच्या पानिपत साहित्याचे सार...इत्यादि मुद्दे विद्वत्ताप्रचुर पद्धतीने थोडक्यात सांगितले आहेत. प्रा० लिमये यांची प्रस्तावना, प्रकाशक गो. ज. कुंटे यांचे दोन शब्द आणि अखेरच्या पराभवमीमांसेची चार पाने (अनामिक) हे साहित्य या सांपा० खंडात आढळते. पानिपत-प्रदेशाचे आणि युद्धकालीन सैन्य मांडणीचे, पटदुर-पानिपत या मजलीचे नकाशे उपयुक्त आहेत.

सांगलीपत्रव्यवहारामुळे पुष्कळ गोष्टी नव्याने कळल्या. पानिपतसंग्रामाबद्दल नव्याने विचार करावयास भाग पाडणारी माहितीही त्यांत आहे. औत्तरीय राजकारणात आमचे सरदार (शिंदे-होळकर) वावरत असत. त्यांचे कारभारी (शिंद्यांचे रामाजी अनंत दाभोळकर-होळकरांचे गंगाधर तात्या चंद्रचूड) यांची ओळख अधिक जवळून होते. आतापर्यंत दुरून पाहिल्यामुळे ते साजरे-गोजरे वाटत. सुरजमल जाटांबद्दलही बरीच खबरबात या पत्रव्यवहारातून प्रथमतः प्रसिद्ध होत आहे. या नव्या यथार्थ दर्शनामुळे सदाशिवराव भाऊंच्या कीर्तीला अधिक उजळा मिळतो. देशी-विदेशी छोट्या मोठ्या इतिहासकारांनी जाटांशी "भाऊ नीट वागला नाही" असा गिल्ला केला, तो अनाठायी असल्याचे समजते. जमीनदारी वळण, कारभारी कावा, यांचा परिचय या पत्रव्यवहारात नव्यानेपण प्रभावी रीतीने होतो. "फडणीशी" कामाची प्राप्ती किती, याचा अंदाज सांगलीपत्रांवरून नीट करता येतो.

## जाटांची पूर्वपीठिका

सुरजमल जाट म्हणजे पानिपत प्रकरणातले एक बडे प्रस्थ. नाकापेक्षा मोती जड असा काहीसा प्रकार जाटांबाबत झालेला दिसतो. मात्र जाट हे कोण, त्यांची पूर्वपीठिका काय, सुरजमलचा आगापिछा वगैरे माहिती बहुतेक मराठी इतिहास-लेखकांनी दिली नाही. ती पंजाब विद्यापीठाच्या खंडात साद्यंत, साधार आढळते. ती लक्षात घेतल्यावर, त्या प्रस्थाचे बूड असे अस्थिर का हे समजते. जाटांचा प्रदेश दिल्लीच्या वाटेवर असल्याने, त्या मुलुखाची "पायमल्ली" फौजांच्या हालचालीमुळे होई. म्हणून दिल्लीला जाणारा-येणारांना जाट-प्रमुखाशी सख्य जोडणे भाग पडे. आगरा-दिल्ली या दोन्ही राजनगरांमधील प्रदेश जाटांचा. म्हणून "व्रजराज" हा किताब सुरजमलच्या पूर्वीच्या जाट प्रमुखाला मिळाला. जाटांशी गोडी-गुलाबीने वागले, तरच दिल्ली गाठता येई. नाहीतर "दिल्ली बहोत दूर" राहून जाटांशी भांडण्यात सर्व बळ खर्चून जायचे !!

जाट ही जमात पंजाब ते काश्मीरपर्यंतच्या प्रदेशात पसरलेली आहे. हिंदु, मुसलमान व शीख अशा तिन्ही धर्मांचे हे लोक आहेत. रांगडेपणात राजपुतांशी त्यांचे

साम्य असले तरी ( विधवा-विवाह रूढ असल्यामुळे ? ) समाजात बनिया व खत्री यांच्याखाली जाटांची प्रतवारी लागते. दक्ष-यज्ञ विध्वंसक वीरभद्र याच्या जटेपासून जाटांची उत्पत्ती सांगतात. कोपिष्ट आणि विध्वंसक प्रवृत्ती जाटात प्रामुख्याने आढळते, तिची उपपत्ति वीरभद्र जटेमुळे समजते खरी. पण आंगणात तुळस ते का लावीत नाहीत, किंवा काळ्या गाईचे दूध वर्ज्य का समजतात; हे कळत नाही. (ज्ञानकोश 'जाट' खं. १४)

## सुरजमलचा कुलवृत्तांत

चूडामण जाट हा पहाता पहाता सामर्थ्यशाली बनला. जयपूरकरांच्या सरहद्दीवर त्याची हालचाल सुरू झाली. तेव्हा सवाई जयसिंहाने चूडामणाचा पराभव केला– जाट नगरीवर " गाढवाचा नांगर " फिरविला. हा अपमान असह्य होऊन चूडामणाने आत्महत्या केली. त्याच्या मागून बदनसिंह हा चूडामणाचा पुतण्या अधिकारी झाला. त्याने प्रथमपासून राजपुतांशी इतके जुळते घेतले की त्याला " व्रजराज " ही पदवी जयपूर दरबारने दिली. पण राजपदवीचा मोह त्याला नव्हता. तो स्वतःस ठाकूरच म्हणवी–आपण जयपूरचे जमीनदार आहोत, ही भूमिका त्याने कधी सोडली नाही. मात्र भरतपुर, कुंभेर, दीग आणि वेर हे किल्ले नव्याने बांधून त्याने व्रजभूमीवरील आपली पकड बळकट केली. दिल्ली दरबारशी बदनसिंहाने असे संगनमत केले की त्याच्या एकाही अपकृत्याबद्दल तक्रार तेथपर्यंत पोचेनाशी झाली. बदनसिंहाचे पराक्रम खास नोंदलेले आहेत. आगरा–दिल्ली दरम्यानच्या प्रदेशात त्याने हैदोस घातला. घरादारांचा नाश केला. इमारतीला उपयोगी अशी वस्तू त्याने बाकी ठेवली नाही. एका खिळ्यासाठी इमारत पाडण्यास तो कचरला नाही. निवडक साहित्य गोळा करून आपल्या प्रदेशात बदनसिंहाने नेले–त्याचप्रमाणे आपला झनानखानाही वाढविला. त्यात १५० बायका होत्या. हे कोणत्या बायकोचे मूल आहे हे आठवण्याची अडचण पडू नये म्हणून–आईचा नंबर आणि नाव सांगण्याची रीत बदनसिंहाने मुलाबाळात रूढ केली. अशा बदनसिंहानंतर सुरजमल व्रज–राज झाला.

दीडशे बायकांच्या या दादल्याने एक मुलगा दत्तक घ्यावा आणि त्याला आपला वारस करावे ही सुरजमलची अजब कहाणी आहे. बदनसिंहाच्या झनानखान्यातल्या एका बायकोची बहीण तिला भेटायला आली. तेव्हा तिच्या कडेवर तिचे मूल होते. बदनसिंहाने तिचे " बदन " पाहिले मात्र– अधिक चौकशी न करता तिची रवानगी झनानखान्यात झाली. तिला " नंबर " मिळाला, पण ही कानामागून आलेली नवी नवरी फार भाग्याची ठरली. तिला पट्टराणीपदाचा मान मिळाला– आणि तिच्या कडेवरच्या मुलाला बदनसिंहाच्या सव्वीस औरस पुत्रांत श्रेष्ठपद लाभले ! ! त्याने त्या मुलाला "आपला"च मानले आणि आपल्या पश्चात् तो गादीवर यावा असे ठरविले. हाच आमच्या इतिहासात चमकलेला सुरजमल जाट. ( पंपा. पृ. ४३–४५ )

### " मराठा रक्तपात करील "

**जाट-मराठे** संबंधाची आठवण मत्स्य-संघ स्थापनेच्या वेळी झाली. भरतपुर-धव ( धो ) लपुर यांचे महाराज मत्स्य-संघस्थापनेस अनुकूल; पण काही जाट नेते प्रतिकूल होते. त्यांचा विरोध संपुष्टात आणून संघस्थापनेचा मुहूर्त श्री. न. वि. गाडगिळांना ( सरदारांच्या आजारामुळे ) साधायचा होता. धोलपुरचे महाराज जाट नेत्यांची समजूत घालताना म्हणाले : हा विरोध पुरे झाला नाही तर हा " आलेला मराठा रक्तपात करील. " हा धाक यशस्वी ठरला. योग्यवेळी मत्स्यसंघ स्थापन झाला.

– ( **पथिक–** भाग २ पृ. २७७ )

जाटांशी आमचे संबंध सलोख्याचे होते. भांडणाचे- वितुष्टाचे कारण नव्हते. पण पेशव्यांनी जातीने (उत्तर) हिंदुस्थानात यावे, दिल्लीच्या कारभारात लक्ष घालावे, हे सुरजमलला तितकेसे पसंत नव्हते. किंबहुना पेशव्यांशी प्रत्यक्ष बोलण्यापेक्षा त्यांच्या सरदारांशी– आणि विशेषतः सरदारांच्या कारभाऱ्यांशी, त्यांचे चांगले रहस्य असे. त्यामुळे सदाशिवरावभाऊ स्वतः आले म्हणून तो थोडा रुष्ट. मराठ्यांना देणे असलेली रकम यावेळी ताबडतोब द्यावी लागेल म्हणून तो जरासा कष्टी. भाऊने त्याची मनधरणी चालविली. तेव्हा आपल्या अटी त्याने ( आधी कारभाऱ्यांशी, टरलेल्या, पण जाहीर न झालेल्या) सांगण्यास सुरवात केली.

## अटीतटींचा सामना

सुरजमलाकडून मराठ्यांना सात लाख रु. मिळायला हवे होते.

सरदारानीं शिफारस केली–निम्मी रक्कम माफ व्हावी. ही माफी मान्य झाल्यावर चार वर्षे खंडणी माफी असावी, अशी दुसरी मागणी आली.

भाऊंनी ती मान्य केली-पण जाटाने म्हटले चारा-ऐवजी पाच साल खंडणी माफ व्हावी.

तेही भाऊंनी मान्य केले.

तेव्हा, "आमचा वकील रूपाराम यास ५०-६० हजारांची जहागीर द्यावी" अशी नवी मागणी पुढे आली.

"कबूल" असे भाऊ म्हणाले.

पुढे जोराने म्हटले "चाकरीस येऊ तेव्हा पोटास द्यावे."

"कबूल."

तरी जाट भाऊस येऊन मिळण्याची लक्षणे दिसेनात! तेव्हा महिपतराम चिटणीस यास जाटाकडे बोलावू पाठविले. पण...... अब्दाली नजीबउद्दौला शुजा-उद्दौला यांच्या वकीलांशी जाटांची बोलणी चालू होती......

हे सर्व प्रत्यक्ष समजल्यावर भाऊचा संताप अनावर झाला नाही, हेच आश्चर्य. परंतु सुरजमल "खटा" (=आंबट) झाला त्याचे खरे कारण वेगळेच होते. मराठ्यांनी दिल्लीचा किल्ला घ्यावा पण गाझी-उद्दीनला किल्लेदार नेमावे; गाझीउद्दीनने दिल्ली शहराची कोतवाली आणि आगऱ्याची किल्लेदारी सुरजमलला बहाल करावी, असे "अंतस्थ" ठरले होते.

आणि हे कुणी ठरविले? उभय-कारभाऱ्यांनी लाखो रुपये घेऊन हे कबूल केले. आपापल्या सरदारांना यातले काही कळू दिले नाही!! कारभारी म्हणजे चंद्रचूड आणि रामाजी अनंत दाभोळकर!!! (**सांपा. पृ.** ५९–६४).

## आंतस्थाचा सुगावा

सदाशिवराव भाऊने दिल्लीचा किल्ला काबीज केला (ऑगस्ट १७६०) तेव्हा त्याला पुष्कळ गोष्टी नव्याने कळल्या. **सांपा.**च्या साहाय्याने आम्हासही त्या आत्ताच कळत आहेत.

भाऊंच्या त्रिनीने (मल्हारराव, जनकोजी, बळवंतराव मेहेंदळे) किल्ल्यात प्रवेश मिळविला. पण किल्ला ताब्यात घेण्यासाठी खटपट न करता लुटालूट आरंभिली. किल्लेदार याकूब अलीने मराठ्यांवर हल्ला चढविला. तेव्हा मराठे पळून गेले. भाऊ दिल्लीस पोचल्यावर हकीगत कळली की याकूब अली किल्ला खाली करून देण्यास तयार आहे. पण तो कौल (अभयपत्र) लिहून जाण्या-साठी मागतो, तो "सरदार, जाट, वजीर" (**सांपा.** पृ. ६१) यांच्या मोहरेचा मागतो. म्हणजे स्वतः सदा-शिवराव भाऊ हजर असता, त्यानी किल्ला "जिंकला" असता, कौल पाहिजे तो भलत्याचा!! सरदार म्हणजे शिंदे होळकर; (यांची नावे ठाऊक होती–कारण तेच लढत होते.) जाट म्हणजे सुरजमल. आणि वजीर म्हणजे गाझीउद्दीन (=इमादुलमुल्क). यांचा संबंध आला नसता–त्यांची नावे किल्ल्यातील लोकांनी घेतली.

व्यवहारी असते तर भाऊने हेही पत्करले असते. पण "दोनदा किल्ला टाकून पलालियाचे (पळून जाणा-राच्या) हवाला किल्ला करीत नाही" हा भाऊचा आग्रह रास्त होता. ह्या कारस्थानाची अशी ओळख पटल्यावर, मग बाकीच्या गोष्टींचा उलगडा होऊ लागला. कारण कारभाऱ्यांनी आणखीही किल्येकांकडे "आंतस्थ" केले होते. आणखी अनेकांचे ते "मिणधे" (=मिंधे) बनले होते (**सांपा. पृ.** ६१).

भाऊसाहेबाला हा आंतस्थाचा शोध लागला हे **सांपा.** वरून कळते. **पंपा.**नेही एका उताऱ्याच्या आधा-राने मल्हाररावाच्या "धर्मपुत्राची" कर्तबगारी सांगि-तली आहे. "ता. ३ सप्टें. १७५७ रोजी नजीब-उद्दौला मल्हाररावांच्या तंबूत गेला आणि त्याने भली मोठी रकम "रिश्वत" म्हणून देऊ केली." (**पंपा.** पृ. ११०) ता. ६ सप्टें. रोजी नजीबने दिल्लीतून आपला पाय काढला.

## एका पिढीची कमाई

ह्या खाबूपणाचे अधिकृत दर्शन घेतल्यानंतर विचार सुचतो तो असा : पेशवे कर्जबाजारी आणि कारभारी लखपति हा काय प्रकार आहे? गंगाधर तात्याला माधवराव पेशव्यांनी तीस लाख रु. दंड ठोठावला... विसाजी कृष्ण लेले यास असाच भला मोठा वीस बावीस लाखांचा दंड बसला होता. बापूजी महादेव हिंगण्या-कडून वीस लाखांचा दंड रघुनाथरावाने वसूल केला. हाच बापूजी "तेरा क्रोड अठरालाख पंधरा हजार












३७१ रु." स जामीन राहिला असल्याचे त्याचे पत्र आहे. (रघुनाथ हरबाजीस) !! नाशिकचे उपाध्याय दिल्लीस जातात काय, एक दोन पिढ्यात लाखो क्रोडोंच्या उलाढाली करतात काय, सर्वच अजब प्रकार वाटतो. आजकालच्या सदाचार समितीसारख्या सचोटी कमिशनने त्यांचे व्यवहार तपासल्यास पूर्वीच्या लाच-लुचपतींची ओळख तरी पटेल.

पानिपत संग्रामाच्या निमित्ताने सांपा. मध्ये फड-णीशी कमाईबद्दल वाद आहे. पेशवा कर्जबाजारी. त्यामुळे ते वारण्यासाठी त्याने "कर्जपट्टी" बसविण्याचा विचार चालविला. राज्याच्या अधिकाऱ्यांनीही आपली काही मिळकत कर्जनिवारणार्थ द्यावी, अशी सूचना पेशव्याने फडणीसास केली. कारण तनखा, तैनात आणि दरक अशा तीन प्रकारे फडणीसांना पैसा मिळे. फडणीस नाना, "नवकोट नारायणा" पैकी एक होते, हे लक्षात घेता फडणीशीची "राजमान्य" प्राप्ती किती असावी याचा अंदाज येतो. सांपा. पत्रात फडणीशी प्राप्तीचा सालीना आकडा दिला नसला तरी तो लाखांनी मोजण्याइतका आहे खास. फडणीसांचा वर्षभराचा कुटुंबखर्च मात्र एवढा नसल्याने शिल्लक रकमेची कर्ज निवारण्यासाठी बरीच मदत झाली असती. परंतु "वृत्तीला धक्का" लागण्याचा सूर निघताच फडणीसांची कर्तव्यनिष्ठा, स्वामिनिष्ठा, राजनिष्ठा, संपुष्टात येते, अगदी संकुचित स्वार्थ उफाळून प्रकट होतो. ते "काशीयात्रे"ची भाषा बोलतात– कलियुगाला दोष देतात ... मूळ मुद्दा म्हणजे राष्ट्र-कर्ज–निवारण याबद्दल अवाक्षर काढीत नाहीत. नाना फडणीसासारख्या मातब्बर पेशव्यांच्या मर्जीतल्या, भानु घराण्याची ही मनोवृत्ती, मग इतरांची कथा काय सांगावी ?

## खावंद कलियुगचे; सेवक ?

अशा लटक्या वैराग्यामुळे, कलियुगाकडे बोट दाख-विल्याने, पेशवा फसतो थोडाच ? "घरोबा कायम राखून, परस्पर सौरस्य टिकवून, तो म्हणतो : "तुमची लेकरे, ती आमची लेकरे. तुम्ही चिंता करावीसे काय आहे ? ... सर्व प्रमुख सेवकांनी खावंदांचे कर्ज वारावे. सर्वांनी मनावर घेतल्यास अवघड काय आहे ? खावंद मात्र कलियुगचे; सेवक मात्र सर्व सत्ययुगचे आहेत !! असो" (सांपा. पृ. ६७) पेशव्याच्या मते फडणी-सांचे वागणे मुळीच रास्त नाही. तो म्हणतो : "स्वामींचे हित मनात न आणता, वरिष्ठ सेवकाचा तुरा लावून सेवा थोडी करून, आपल्या लाभावर सेवक नजर देऊ लागले. यास्तव आमची मर्जी नाजुक, रागीट, सर्वांस वाटू लागली." ( सांपा. पृ. ६८ )

या निमित्ताने पेशवाईतल्या सेव्य–सेवक भावाच भावाची पुसट कल्पना येते. फिरतीवर असल्याने तब्येत ठीक रहात नसेल, तर पेशवा लिहितो–"शरीर प्रकृत वाईट असली तर पुण्यास जाऊन दोन महिने शरीर प्रकृत नीट होईल ( असे रहावे )". काशीयात्रेला जायचे तर "संतोषे जाऊन येणे तर यावे. "कारण" रुसून रागे करून जाता, असे असता आम्ही निरोप कसा द्यावा ?" एवढेच नाही तर पेशवा स्पष्टपणे अंत-रीची भावना लिहितो "तुम्ही उदासत्व टाकावे. संतोषे असावे. ज्यात तुम्ही उदास होऊन जावे, असे आम्हांस सहसा कर्तव्य नाही. व्यर्थ आमचा वाईट लौकीक होय ते तुम्ही न करावे." ( सांपा. पृ. ६६-७६ ) धन्य असे धनी की जे आपल्या सेवकांची अशी काळजी वाहतात !

## "दौलत वाढवून कर्जच मेळविले"

हा पेशवा-फडणीस सवाल-जबाब पत्रव्यवहार केव्हा चालू आहे ? तर पानपतावर भाऊच्या कंठी प्राण आले– दक्षिणेकडून खजिना, कुमक, रसद केव्हा येते, इकडे लाखो डोळे लागलेले. भाऊच्या साहाय्यार्थ पेशवा उत्तराभिमुख होऊन मजल दरमजल पुढे सरकत असता ! ! दोघेही फर्डे. ज्या गांवच्या बोरी–त्याच गांवच्या बाभळी म्हणतात–तशांपैकी, फडणीसांची बाजू बाबुराव रामाजी ( नानांचा काका ) वडिलकीच्या नात्याने मांडतो. त्याने इतर कारभाऱ्यांची, दिल्लीतल्या वकीलांची उदाहरणे सांगितल्यामुळे पेशवा संतापला. पत्रात त्याचा संताप व्यक्त झाला तो मात्र वेगळ्या रीतीने. बाबुराव फडणिसाला पेशवा बजावतो– "तुमचा पेशा पतिव्रता स्त्रीप्रमाणे. कलावंतीणीसारखे अंताजी-माणकेश्वर वगैरे, त्या तऱ्हेच्या सेवकांच्या साक्षी तुम्ही लिहिल्या, ह्या तुम्हास योग्य नाही...... एकनिष्ठ असतील, केवल दौलतीचे वृद्धी इच्छिणारे, यांची साक्ष घेतली तर असो." ( सांपा. पृ. ७२ ) युक्तिवाद देखील पेशव्याने बिनतोड केला. दौलत वाढली तिजबरोबर फडणीसही वाढले. पण पेशवा म्हणतो :










"आम्ही दौलत वाढवून करोड रु. कर्जच मेळविले. तुम्ही त्यातच वाढला. परंतु कर्ज नाही. काहीतरी सिलकच असेल. उत्तम पक्ष ... तुम्ही विवेकी. खावंदाचे घर जाणता ...

"खावंदाचे कर्ज वारे तो सर्वांनी आप्त, एकनिष्ठ खावंदाचे संसारास आपले संसाराप्रमाणे जाणतात. त्याणी मी म्हणतो तसें करावे. त्यात तुम्ही पुढे होऊन करावे यातच हिंमत, एकनिष्ठतेची परीक्षा आहे ... (सांपा. पृ. ७३)

फडणिशी कमाईबद्दल थोडी अधिक माहिती मिळती तर हवी होती. पण या बाबतीतले आमचे जाणकार अधिकारी शंकरराव जोशी. त्यांना सुद्धा एतत्संबंधी अधिक सांगता आले नाही. पेशवा म्हणतो– "तुम्ही मिळकतीचा हिसाब नांववार दाखवायचा नसेल तर नका दाखवू. तुमच्या उत्पन्नाचा अंदाज घेऊन, कारकुनांना देण्यासाठी दहा हजार काढून ठेवून, तुमचा घरखर्च भागवून तुम्ही एक लक्ष दहा हजार रु० कर्जपट्टी म्हणून भरणा करावे. कर्ज वारून खजाना भरू लागल्यावर, तुम्हीच प्रमुखपणे दरबार–खर्चाचा बंदोबस्त करावा, हे तुम्हास योग्य होते "... पण इतकी उदार वृत्ती फडणिसांपैकी कोणात नव्हती हे स्पष्ट आहे. "अंताजी माणकेश्वर वगैरे" ना पेशवा कसा लेखतो तेही व्यक्त झाले आहे.

## त्रोटक पण महत्त्वाचे

सांपा. च्या शेवटी "पानिपत–युद्ध–पराभव मीमांसा" (पृ. १–४) या उपसंहारात काही इतिहास विषयक सिद्धान्त मांडण्याचा प्रयत्न केला आहे. आपल्या पूर्वजांनी पराक्रम केले तसे वेगळ्या अर्थानेही त्यांचे काही पराक्रम गाजले असल्याने "यशापयशाचे सर्व (जण) सारखेच वाटेकरी व वारसदार आहोत," ह्या प्रतिपादनाबद्दल मतभेद नाही. पण इतिहासाच्या अभ्यासात आपला इतिहास आणि "स्वेतरांचा" (=परकीयांचा) इतिहास असा भेद कल्पून, त्यांच्या अभ्यासात किंवा अभ्यासाच्या उपयोगात, "प्रतवारी" लावू पहाणे हे इतिहास–शास्त्राला विसंगत वाटते. पंडित नेहरूंनी प्रियदर्शनी इंदिरेस जागतिक इतिहास पत्ररूपे सांगितला–तेव्हा प्रथमच त्यानी लिहिले की "मानवी इतिहास" हा अखंड समजून त्याचा अभ्यास करावा. हाच खरा शास्त्रीय दृष्टिकोन. इतिहासाचा उपयोग राष्ट्रीय लढ्यात किंवा लष्कर-भरतीसाठी चांगला झाला हा विशिष्ट परिस्थितीचा परिणाम होय. किंबहुना देश-काल-बाधित असे इतिहासाचे स्वरूप असल्याने तो वारंवार लिहिण्याची, पुनः पुनः लिहिण्याची आवश्यकता भासते.

इतिहासकालातील घडलेल्या चुकांबद्दल लिहिणे अवघड आणि नाजुक होऊन बसले असल्याचा उल्लेख रास्त आहे. पण तो अपरिहार्य आहे. निझामाने इतिहास संशोधन "खाते" चालविले तर त्या खाते-प्रमुखाला खरा इतिहास स्पष्टपणे सांगण्यास प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष बंदी असावयाचीच. राजपुतांच्या आश्रयाने, नबाबांच्या आश्रयाने किंवा इतर राजे महाराजे यांच्या आश्रयाने सिद्ध झालेल्या ऐतिहासिक प्रयत्नातल्या "उणिवा" अथवा त्यातले आधिक्य हे जाणत्यांना ताडता येते. जयपूरचा इतिहास सर जदुनाथांनी लिहिला, दरबारी आज्ञेने लिहिला आणि आपली फी घेतली; पण तो इतिहास प्रसिद्ध करणे न करणे हे दरबारी इच्छेवरच बव्हंशी अवलंबून आहे. इतिहासकाराने दुरभिमानाच्या आहारी जाऊ नये, हे खरे; पण प्रत्येक छोट्या मोठ्या राज-वंशाला आपापल्या परीने अभिमान वाटत असतो. त्या अभिमानाच्या, स्वाभिमान आणि दुरभिमान ह्या छटाही अपरिहार्य. फक्त त्यांचा प्रभाव कितपत असावा– त्यांचा परिणाम कोठपर्यंत व्हावा याबद्दल मतभेद होतो- तोही अपरिहार्यच म्हटला पाहिजे. "आसुरं कुलमनादरणीयम्" असे नित्य-पाठ करणाऱ्या प्रल्हादाने "वडिलांचा उद्धारच" प्रथम वराने मागितला— यांतील रहस्यही हेच आहे. हे विवेचन मूलगामी, अत्यंत तात्त्विक आणि व्यवहारी दृष्टीचे असून ते इतके त्रोटक (आणि अ–नामिक) का राहिले ते कळत नाही. पण त्यातील विचार महत्त्वाचे आहेत– त्यांचा विलास त्या अनामिक लेखकांनी स्वतंत्रपणे चालवून विचारवंतांना संतोषवावे– एवढी आग्रहाची विनंती.

२

पानिपत संग्रामाची द्विशताब्दी म्हणून पंजाब युनिव्हर्सिटीने हा ग्रंथ अनेक विद्वानांच्या सहकार्याने सजविला. त्यावेळचे पंजाबचे राज्यपाल श्री. न. वि. (काका) गाडगीळ होते. त्याच्या चालनेमुळे हा ग्रंथ

तयार झाला, अशी स्पष्ट कबुली संपादकांची आहे. डॉ. हरीराम गुप्तांसारखे जदुनाथ सरकार शिष्य ह्या ग्रंथाचे संपादक-नियोजक असल्याने त्यांच्या पद्धतशीरपणाबद्दल वेगळे लिहिण्याचे कारण नाही. नकाशे, सूचि, चित्रे, ग्रंथांची यादी, आधार...या बाबी जशा हव्या तशा आहेत.

पंजाबी पानिपत ग्रंथाचे स्वरूप मोठे आकर्षक आहे. तीन विभागात याची वाटणी आहे. मराठ्यांचे उत्तरेतील राजकारण हा पहिला ( ले. ह. रा. गुप्ता ). यात तेरा प्रकरणे मिळून इतिहास सांगताना फार्सी, मराठी, हिंदी साधनांचा आधार घेतला; सर जदुनाथ सरकार, पद्मभूषण ( रियासतकार ) सरदेसाई यांना "वाट पुसतु" ते राजकारण समजाविले ( पृ. १-१६९ ). दुसरा विभाग प्रत्यक्ष मोहिमेचा ( सहा प्रकरणे- ले. डॉ मेहरा ) ( पृ. १७३-२४१ ). तिसरा विभाग विशेष महत्त्वाचा. त्यात अधिकारी अभ्यासूंनी परिणामांची छाननी केली. पराभवाची कारणे- त्यांचे तात्कालिक परिणाम सांगितल्यावर ' मराठ्यांची सरशी झाली असती तर ?..." हा सुखस्वप्नासारखा प्रश्न विचारून त्याचे उत्तर दिले आहे. त्यासाठी पुष्कळ शोध करावा लागला. आजच्या तेथील वस्तीत दोनशे वर्षांपूर्वीच्या घटनांची आठवण कोणत्या स्वरूपात शिल्लक आहे याचा घरोघर हिंडून तपास केला. पंजाबात स्थाईक झालेल्या मराठे मंडळींची बरीच माहिती नव्याने मिळविली. शीख मराठे-संबंध आणि सहाराणपुरची कामगिरी- दिल्लीचे ऐतिहासिक कार्य... अशा विविध अभ्यासांनी नटलेला तिसरा भाग ह्या पुस्तकाचा "तुरा" मानला पाहिजे ( पृ० २४७-३४५ ).

**अर्पणातील कृतज्ञता**

पंपा० च्या एकंदर निवेदनाचा विचार पानिपत-संग्रामाचे नव्याने मूल्यमापन करण्याचा असला तरी प्रथमपासून त्या दृष्टीने आपलेपणा आहे. समजूतदारपणा आहे. मराठ्यांबद्दल इतरत्र आढळते तशी "अढी" नाही. ह्या आपलेपणाची ओळख अर्पणपत्रिकेत होते—

> स्वदेश, स्वधर्म आणि स्वातंत्र्य यासाठी आत्मत्याग करणाऱ्या सर्व श्रीमंत-गरीब, उच्च-नीच, लहान मोठ्या अशा- महाराष्ट्राच्या शूर स्त्रीपुरुषांच्या **स्मृतीस अर्पण.**

हे अर्पण म्हणजे आदरपूर्वक कृतज्ञतेने केलेले तर्पण आहे. पंजाबी जनता मराठी मनाशी समरस झाली, याचे कारण मराठ्यांप्रमाणे शिखांनी काही वर्षे राज्ये चालविली- राज्याखातर लढाया मारल्या. आणि मुख्य म्हणजे सरहद्दीवर राहिल्यामुळे "परचक्राचा" अनुभव त्यांना होता. आक्रमकांना थोपविण्याचे धारिष्ट दाखविणाऱ्या स्वबांधवांबद्दल त्यांना कौतुक, आदर, अभिमान साहजिकच वाटला. ह्या धारिष्टापोटी मराठ्यांबद्दल कृतज्ञताही होती. कारण अब्दालीला थोपविण्यासाठी मराठे घरादारापासून ८००-९०० मैल दूर आले होते. त्यांत लहानथोर मंडळी होती. ही वस्तुस्थितीची जाणीव पंजाबी माणसाला आपसूक झाली तशी इतर प्रांतातील फार थोड्या विचारवंताना झाली. कारण त्यांच्या दृष्टीवर पूर्वग्रहांचे पटल होते. काहीही असो- मराठ्यांच्या ऐतिहासिक कामगिरीचे यथार्थ मूल्यमापन करावेसे इतर प्रांतीयांना वाटले, यातच आम्हास पुष्कळ समाधान आहे.

विवेचनाच्या दृष्टीने पंपा. खंडात पुष्कळ नवी दृष्टी आणि स्वतंत्र वृत्ती आढळते. पानिपतचा संग्राम सांगताना आतापर्यंत आलेल्या वर्णनाची छाननी त्यात निर्भीडपणे केलेली आहे ( पृ. २३७-४३ ). काशीराजाच्या म्हणण्याप्रमाणे "अब्दालीच्या प्रत्येक शिपायाने दहा ( कित्येकानी वीस ) उंट लादून लूट नेली." दुसऱ्या एका तवारिखीप्रमाणे "७०० हत्ती, घोडी, बैल आणि उंट ( प्रत्येकी २५ हजार ) यावर लादून लूट नेली. ही अतिशयोक्ती असल्याचे स्पष्ट पटवून दिले आहे. आधीच मराठे साधे-कमी छानछोकीचे; त्यांचे कपडेही साधे-त्यांची तट्टे-तट्टांची "पल्याणे" सुद्धा साधी. त्यांत "घोडी चारा खायचे विसरे-" पर्यंत त्यावर उपासमारीची पाळी आलेली. त्यांच्या छावणीत इतकी लूट असेल कशी ?

आणखीही एका प्रकारे या अतिशयोक्तीची छाननी केली आहे. अफगाण शिपाई अब्दालीकडे तक्रार करीत होते. त्यांचा दोन वर्षांचा पगार थकला होता. त्यांच्या तक्रारीचा सूर असा होता—

"आम्हांला मिळालेली लूट रोहिल्यांना विकावी लागली. त्यांनी आम्हांस रुपयांत दोनच आणे किंमत दिली !! काही खायला मिळेना तेव्हा दुसरा मार्गच नव्हता... इराणात अशा प्रचंड लढाईत सोनेनाणे






घोडे, जीन... कपडा — कितीतरी जिन्नस हाती लागले असते. पण मराठ्यांच्या छावणीत होतं काय ? लोक उघडेच ! त्यांचे भाले चकचकीत होते खरे; पण ती घोडी– घोडी कसली भिकार तट्टे... चार तुमान ( – फार्सी नाणे ) कुणी त्याला दिले नसते.... "

घोड्यांवर, उंटांवर, हत्तीवर लादलेली ही लूट असेलसे वाटत नाही लुटीचे आकडे भरमसाट फुगवलेले दिसतात हे उघड झाले. इतिहासाची छाननी करणारा निःपक्षपाती लेखक पंजाबविद्यापीठाने मिळविला हे मोठे समाधान होय.

## सहाराणपुरचे महत्त्व

ह्या पानिपत खंडात विचाराचे, दृष्टिकोनाचे नाविन्य आढळते. "सहाराणपूर"चे ऐतिहासिक कार्य ( पृ. ३०६–२० ) सांगताना इतिहास–कथनाची व्यापक दृष्टी पत्करलेली दिसते. हा सहाराणपूर विभाग म्हणजे दुआबातला अत्यंत सुपीक प्रदेश. मोगल राजवटीत हा सर्फ–ए–खास (= क्राऊन लँड ) म्हणजे खास बादशहांच्या वैयक्तिक तैनातीचा मानीत. दुष्काळ असा त्या विभागास ठाऊकच नाही. दिल्लीचा दरबारी खर्च येथील उत्पन्नावर चाले. यामुळे येथे हवाखोरीला बादशहा येत. येथील हिरवळ, उभे पीक व त्यांच्या आश्रयाने वावरणारे पशुपक्षी यांची शिकार चाले. त्याच कारणामुळे जमिनीची मशागत सारखी होत राही. जमीन पडीक रहात नसे. पाट–बंधारे; विहिरी यांची डागडुजी होत राही. पैदासीची वाढ-विविधता करण्याची अहमहमिका चाले. किसानांचे हित व्हावे म्हणून अनेक सुखसोई त्यांना उपलब्ध झाल्या. एकुण काय, तर सहाराणपूर आपल्या ताब्यात ठेवणे म्हणजे धान्याचे एक मोठे कोठारच हस्तगत करण्यासारखे होते. नजीबउद्दौल्याने येथील पैदास पुष्कळ वाढविली असा इतिहास आहे. याच्या उलट, मल्हारराव होळकर, राघो भरारी, दत्ताजी शिंदे, गोविंदपंत बुंदेले किंवा खुद्द सदाशीवरावभाऊ यापैकी एकालाही या प्रदेशाचे महत्त्व यथार्थतेने समजले नाही– निदान समजले असल्याचा पुरावा उपलब्ध नाही. याठिकाणी कष्टाळू "गुजर" जमात राबते-तिचा अनुनय इतर अधिकाऱ्यांनी केला तसा मराठा अधिकाऱ्यांनी मुळीच केला नाही, त्यांना तो साधला नसावा. मराठ्यांना "वसूल" मिळवावयाचा होता तर निदान "वसूल" पिकवणारांकडे थोडे तरी व्यवहारी दृष्टीने पहाणे जरूर होते. तसे मराठ्यांना साधले नाही– ही मुलुखगिरीची शोककथा आहे.

पानिपत-संग्रामात सहाराणपुरने काय पराक्रम गाजविला तो पाहिला म्हणजे मराठी अदूरदृष्टी अधिक स्पष्ट होते. धान्याची नड मराठी छावणीत प्रथमपासून होती. म्हणून तरी त्यांनी धान्य पुरवठा करणाऱ्या प्रदेशाकडे नजर देणे आवश्यक होते. या उलट सहाराणपूरचा हा प्रदेश अखेरपर्यंत अब्दालीला "अक्षय्य" कोठाराप्रमाणे धान्य पुरवीत राहिला. मराठ्यांवर उपासमारीचा प्रसंग आला तसा अब्दालीवर मुळीच आला नाही– याचे कारण सहाराणपूर. ही नवी दृष्टि पानिपत वृत्तांतात आणली हे पपांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणता येते.

## दिल्लीची करुण कहाणी

दिल्लीची कहाणी ही विशेष माहिती अभ्यासपूर्वक जमवलेली पंपा.मध्ये आढळते ( पृ. ३२१–२७ ). साहित्य सम्राटांनी या शाही नगरदेवतेस "रुधिर प्रिय" म्हटले होते. ते नांव दिल्लीला "फिट्ट" लागू होते. कारण स. १७३९ ते स. १७६१ पर्यंतच्या २२–२३ वर्षात दिल्लीच्या नशिबी नऊ "गर्द्या" आल्या. नादिरशहापासून या गर्दीची सुरुवात होते. अब्दालीची दुसरी गर्दी. जाट, बलूच, गुजर, रोहिला या गर्द्या एकामागून एक दिल्लीवर कोसळल्या. मराठा गर्दी अनेक वेळ दिल्लीने अनुभवली. पहिल्या बाजीरावने अचानक दिल्ली गाठून येथील बादशहा व शहरातले धनिक यांना चकित केले. ( स. १७३७ एप्रिल ) तेव्हापासून स. १७५८ पर्यंत आठ वेळा दिल्लीचा थरकाप मराठी फौजांच्या आक्रमणामुळे झाला. खंडेराव, राघोभरारी, अंताजी माणकेश्वर, मल्हारराव, दत्ताजी शिंदे अशा निरनिराळ्या सरदारांची नांवे या गर्द्यांशी निगडित आहेत.

या कालावधीत दिल्लीची लूट ३२ वेळा झाली. दोन बादशहांची डोकी उडविली. एका माजी राणीला –दुसऱ्या माजी राजमातेला प्राणास मुकावे लागले. पण तत्पूर्वी त्यांचे डोळे काढले. एका जुन्या वजिराचे हाल हाल करून त्याजकडून पंधरा कोट रु. वसूल केले.









दुसऱ्या वजिराला ठार करून त्याच्या प्रेताचा संस्कारही यथासांग होऊ दिला नाही. माणसे किती ठार झाली, किती लुळी पांगळी झाली, किती बायका पळविल्या, भ्रष्ट केल्या किंवा आत्महत्त्या करत्या झाल्या यांची गणनाच करता यायची नाही.

एकीकडे दिल्लीचे वैभव लोकांच्या डोळ्यात भरते–पण त्या वैभवामुळेच दिल्लीवर हे दुर्धर प्रसंग ओढवले. इंद्र बदलला तरी इंद्राणी तीच रहाते म्हणतात–तसे दिल्लीच्या श्रीमंती वैभवाचे दिसते. इतक्या वेळा निरनिराळ्या सत्ताधीशांना लुटीचा मोह पाडण्याइतके अक्षय्य वैभव दिल्लीने मिळविले कसे ? राजवट कुणाची का असेना, हम करेसो कायदा म्हणणारा एकतंत्री लहरी सुल्तान असो, सर्व प्रजेला सारख्या प्रेमाने वागवणारा परमन्यायी बादशहा असो किंवा औरंगजेबाप्रमाणे कडवा, इतर धर्मीयांचा छळ करणारा, डामडौलाचा तिटकारा असलेला दिल्लीपती असो, ब्रिटिशांसारखा सनदशीर कारभाराचा कैवारी राजप्रतिनिधी असो किंवा भारतीय लोकशाही गणतंत्राचा डॉ. राधाकृष्णन् सारखा तत्त्वज्ञ मुकुटमणी राष्ट्रपती असो, दिल्लीच्या छानछोकीत, श्रीमंती चोचल्यात किंवा संपत्तीच्या प्रदर्शनात फारसा फरक नाही.

## यथार्थ महत्त्वमापन

पानिपत संग्रामाचे यथार्थ मूल्य पारखणारे इतिहासकार आहेत– आणि त्यानी ते राज्यकर्त्यांचे प्रतिनिधी असता–म्हणजे मराठ्यांचे दोष-वर्णन लाभकारी ठरणारे होते तेव्हा–आपले निर्भीड मन स्पष्ट नोंदून ठेवले आहे. मेजर ईव्हॅन्स बेलने लिहिले : पानिपत संग्राम हा मराठ्यांना मोठा अभिमानास्पद आणि कीर्तिदायक ठरला. “ सर्व हिंदी जनतेसाठी हिंदुस्थान ” या ध्येयासाठी ते लढले. प्रो. रॉलिन्सन तर पुण्यात डेक्कन कॉलेजमधले इतिहासाचे प्राध्यापक. मेजर ब्राऊनने काशिराजकृत फार्सी वृत्तांताचे इंग्रजी सार काढून छापले त्याची दुसरी आवृत्ति स. १९२६ मध्ये मुंबई विद्यापीठासाठी ऑक्स्फर्ड युनि० प्रेसने प्रकाशिली. ती रॉलिन्सनने संपादिली. तेव्हा संपादकीयात म्हटले : “ राष्ट्रातील निवडक शिलेदारांसह आपल्या देशाच्या व धर्माच्या शत्रूंशी लढताना मराठ्यांनी जे मरण पत्करले, त्याहून अधिक गौरवास्पद मरण इतिहासात क्वचितच नोंदले असेल. ”

“ रियासतकार ” हे तर महाराष्ट्राचे एकुलते एक इतिहासकार. चार पाच तपे इतिहासाचा त्यांचा निदिध्यास. त्यानी म्हटले : “पानिपतावर जयप्राप्तीने जे कार्य झाले नसते ते मराठ्यांच्या संहाराने साधले. ह्या संग्रामामुळे मराठ्यांची कीर्ति यावच्चंद्रदिवाकरौ उज्ज्वल राहील. कितीही राज्यक्रांत्या किंवा प्रचंड घडामोडी झाल्या तरी पानिपतच्या आठवणीने मराठ्यांना सदैव स्फुरण चढेल. ”

परंतु पानिपत–संग्रामाबद्दल असा वाजवी दृष्टिकोन पुष्कळ इतिहासकारांचाही नाही. मग सर्वसामान्यांची काय कथा ? उठल्या सुटल्या भाऊला दोष, मराठ्यांची पोटभर नालस्ती, अब्दालीच्या असल्या-नसल्या गुणांची तोंडभर प्रशंसा..... असा प्रकार सर्वत्र आढळतो. पानिपत-लढाईत भाऊच्या चुका कोणत्या हा तर शाळकरी परीक्षांतला दर सालचा प्रश्न ठरून गेल्यासारखा आहे. इतका वेडेपणा आमच्या २०० वर्षांपूर्वीच्या पूर्वजांच्या आंगी होता–असे आम्ही समजावे काय ?

घरदार सोडून, उत्तरेकडल्या कडाक्याच्या थंडीत, भर उघड्यावर आमच्या फौजा तळ देऊन होत्या. खाण्याचे हाल तर मनस्वी झाले. घर सोडून ८००–९०० मैल दूर “पर” देशात इतके हाल कशासाठी आमच्या पूर्वजांनी सोसले ? मारवाडातले राजपूत, व्रजभूमीतले जाट किंवा इतर छोटे मोठे रजवाडे, जमीनदार, यांचे सहकार्य नाही; उलट आता “ कशी झुंपते ” पाहू म्हणून तमाशा पहाण्यास पुष्कळ जण तयार असता सदाशिवराव भाऊने हे धाडस केले. त्यावेळी भाऊचे वय पहावे तर– ( पानिपतच्या वाटेवर ) “ गंभीर ” ओलांडताना त्याला ३१ वे आणि विश्वासरावाला १९ वे वर्ष लागले. या जवानीत हिंमत केवढी अफाट ! लाखो लोकांचा “ संसार ” चालवून, त्यांना घरापासून शेकडो मैल दूर नेऊन, औत्तरीय थंडीत छावणी करून गिलच्यांशी लढायची तयारी ठेवायची ! !

भाऊबरोबर मोहरी कोणती ? तर विश्वासराव; जवानमर्द जनकोजी, त्याच वयाचे फडणीस नाना;








मल्हारराव, इब्राहिमखान गारदी. गांठ कुणाशी ? तर नादिरशहाच्या तालमीत तयार झालेल्या, क्रौर्यात त्याच्यापेक्षा सवाई ठरलेल्या अब्दालीशी ? भाऊला मोफत सल्ला मिळे तो इब्राहिमखानापासून सावध रहाण्याचा ! छावणीत चारा वैरण–धान्य–यांचे दुर्भिक्ष. "त्रिण" दृष्टीस न पडे. "ताटे, वाट्या, चंबू... वगैरे तोडून मोहरा पाडून" लोकास द्याव्या लागल्या. तरी एकानेही भाऊची अवज्ञा केली नाही. इब्राहिमखानाचे इमान– कारभाऱ्यांच्या कारवाईपुढे– विशेष चमकदार ठरले. भाऊने या लाखो जनांचा विश्वास एवढा मेळविला की त्याच्या विरुद्ध कुणी पुकारा केला नाही– उघड वा छुपा बंडावा मांडला नाही. या प्रसंगी नेहरू–शेख अबदुल्ला या राजकीय मैत्रीचा उल्लेख करावासा वाटतो. इब्राहिमखानाची इमानदारी जशी कौतुकास्पद तसाच धन्याचा सेवकावरचा विश्वास, निष्ठा कौतुकास्पद नव्हे का ? ही उभयपक्षीची बहाद्दरी आहे.

## भाऊचा पोवाडा

अशा भाऊंबद्दल अशा मराठ्यांबद्दल, इतरांनी काहीही म्हटले तरी त्यांचा त्याग, त्यांची तत्त्वनिष्ठा किंवा त्या तत्वनिष्ठेसाठी मरण पत्करण्याची तयारी -स्वगृहापासून शेकडो मैल दूर जाऊन हातावर शिर घेऊन लढण्याची हिंमत- हे सर्व गुण त्या वेळच्या जनतेला कळले नसतील असे म्हणवत नाही. एकादा कुणीतरी दुष्ट बुद्धीचा, उपकाराची जाणीव नसणारा, आपला हितकर्ता न ओळखणारा असतो. पण बहुजन समाज हा गुणांचा चाहता–त्यागाचे कौतुक करणारा –हिंमतवानाची कदर करणारा, शौर्याचे पवाडे गाणारा असतो, पंजाबच्या भूमीवर हजारो मराठा–वीरांचे रक्त सांडले– ह्याबद्दल पंजाबी राष्ट्र अगदी उदासीन कसे राहील ? पानिपतच्या आसपास भाऊ आणि पार्वतीबाई यांची नांवे त्या लोकांनी मोठ्या आदराने उच्चारली तर त्यांत गैर काय आहे ? भाऊ चिरंजीव आहे; नंतर अनेक वर्षे तो साधुरूपाने जवळपास रहात होता. इत्यादी कहाण्या रूढ झाल्या असल्यास त्या स्वाभाविक होत्या. स. १८५७ नंतर नानासाहेबासंबंधी नाही का अशाच दंतकथा पसरल्या ?

पानपतच्या आसमंतात भाऊंचा (हिंदी) पवाडा लोकांत ठाऊक होता तो दोन इतिहास संशोधकांनी मिळून पुरा केला. डॉ. कालिकारंजन कानुंगो यांनी स. १९३८ मध्ये सरदेसाई कॉमेमोरेशन व्हॉल्यूम मध्ये तो मिळाला तेवढा सटीप छापला. पुढे प्रा. शेजवलकरांनी स. १९६१ मध्ये आपल्या पानिपत ग्रंथात संपूर्ण– कानुंगोना मिळाला त्यापेक्षा थोडा अधिक– छापला. लोकांच्या तोंडी पोवाडारूपाने पिढ्यान्‌पिढ्या रहाण्याचे भाग्य विनाकारण लाभत नाही. म्हणून पुनः सांगावयाचे की सेनानी म्हणून भाऊच्या चुका कितीही असोत. मराठ्यांचा– पेशव्यांचा प्रतिनिधी म्हणून त्याचे धोरण चुकले असो. इतर राजपूत, जाट व हिंदु सहकारी मिळविण्यात त्याला अपेश आलेले असो, आपल्या आवाक्याबाहेरची कामगिरी त्याने पत्करली असो– आणखी कितीही दोष त्याचे असले तरी प्रखर तत्त्वनिष्ठा, प्राणपणाने लढण्याची तयारी आणि त्या लढण्यासाठी घरादारापासून ८००–९०० मैल मजल मारण्याची त्याची कुवत याबद्दल सर्व राष्ट्राला कृतज्ञता वाटेल. त्याने बरोबर नेलेल्या सर्व लष्कराने केलेल्या प्राणत्यागाबद्दल तमाम राष्ट्र ऋणी राहील.

पंजाब युनिव्हर्सिटीने हे काम पत्करून ते चांगल्या तऱ्हेने पार पाडून ह्या ग्रंथरूपाने आपली कृतज्ञताच व्यक्त केली आहे. पंजाबी जनता आपल्या कर्तव्याबाबत किती जागरूक आहे त्याचे हा ग्रंथ प्रत्यक्ष उदाहरण होय. पंजाब–महाराष्ट्र यामधील भावनात्मक ऐक्याचा दुसरा पुरावा हवा कशाला ?

---








प्रा. गं. ब. ग्रामोपाध्ये

# प्रा. वा. ल. कुलकर्णी

डिसेंबर १९६५ च्या २५, २६, व २७ या तारखांना हैदराबाद येथे मराठी साहित्य संमेलनाचे ४६ वे अधिवेशन भरत आहे. जुन्या घटनेप्रमाणे हे ४६ वे संमेलन असले तरी साहित्यमहामंडळाच्या नवीन घटनेप्रमाणे भरणारे हे पहिलेच संमेलन आहे. आणि या संमेलनाचे अध्यक्ष म्हणून मराठीतील एक अग्रगण्य टीकाकार व मराठवाडा विद्यापीठाचे मराठी विभाग-प्रमुख प्रा. वा. ल. कुलकर्णी हे निवडून आले आहेत, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. ते जसे नव्या आधुनिक वळणाची टीका लिहिणारे प्रमुख टीकाकार आहेत, तसेच मराठीचे निष्णात प्राध्यापक आहेत. त्यांच्या व्यक्तिमत्त्वात यापैकी टीकाकार अधिक प्रभावी आहे की प्राध्यापक अधिक प्रभावी आहे, हे सांगणे कठीण आहे. किंबहुना या दोहोंच्या समवायातून त्यांचे व्यक्तिमत्त्व बनले आहे, हे म्हणणे अधिक योग्य ठरेल. या त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या घडणीत बी. ए. आणि एम्. ए. या परीक्षांसाठी त्यांनी ज्या विषयांचे अध्ययन केले त्या विषयांचा अंशही कमी नसावा. ते जेव्हा बी. ए. झाले. तेव्हा बी. ए. च्या अभ्यासक्रमात मराठीच्या आजच्यासारख्या सहा प्रश्नपत्रिकांचा अंतर्भाव मुंबई विद्यापीठात अजून व्हावयाचा होता. त्यामुळे असेल कदाचित् पण त्यांनी बी. ए. परीक्षेसाठी इंग्रजी हा विषय निवडला आणि त्यात ते सन्मानपूर्वक उत्तीर्ण झाले. त्यानंतर एम्. ए. परीक्षेसाठी मात्र सहा प्रश्नपत्रिकांचा खास ऐच्छिक विषय म्हणून मराठी विषय घेता येत असल्याकारणाने त्यांनी तो विषय घेतला व त्यात ते प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले. त्या वर्षीचे चिपळूणकर पारितोषिक अर्थात् त्यांनाच मिळाले. वा. ल. कुलकर्णी यांच्या परीक्षेतील यशाचा व त्यासाठी त्यांनी निवडलेल्या विषयांचा उल्लेख एवढ्याचसाठी केला की, ज्या प्रकारचे टीकालेखन नंतर त्यांनी करावयाला सुरुवात केली त्याची पूर्वतयारी वा पार्श्वभूमी थोडी-फार लक्षात यावी. परीक्षेसाठी निवडलेले विषय व तदनंतरचे लेखन यांचा असा अन्योन्य वा साक्षात् संबंध असतोच असे नाही. परंतु काही उदाहरणात तो असूही शकतो. आणि मला वाटते, वा.लं. ची (वा. ल. कुलकर्णी यांना मराठी साहित्यसृष्टीत 'वा. ल.' म्हणूनच संबोधिले जाते.) गणना या दुसऱ्या प्रकारात करणे योग्य होईल. किंबहुना मी तर असेही म्हणेन की ज्याला मराठीसारख्या आधुनिक वाङ्मयावर लेखन करावयाचे आहे त्याला इंग्रजी मराठीची ही जोड उपयुक्त ठरावी. इंग्रजीतील अभिजात वाङ्मयाच्या व वाङ्मयीन मूल्यांच्या परिशीलनाने वाङ्‌मयाच्या सौंदर्याविषयीची व त्याच्या मूल्यमापनाविषयीची योग्य ती समज येऊ शकते. आणि शिवाय त्याच्या आधाराने मराठीतील नव्या जुन्या वाङ्मयाचे, त्यामागील वृत्तिप्रवृत्तींचे, वेळोवेळी होत गेलेल्या त्याच्या आविष्काराचे व त्यांमागे जे अनुबंध अनुस्यूत असतात त्यांचे, योग्य ते मूल्यमापन करता येते. अर्थात् त्यासाठी करावयाचा अभ्यास केवळ परीक्षेतील यशासाठी करून भागणार नाही, तर तो त्या विषयाच्या प्रेमाने, त्यातील सौंदर्यस्थळे पाहण्याच्या आवडीने आणि आस्थेने केला गेला पाहिजे, हे जसे खरे, तसेच तो अभ्यास पुढे टिकला पाहिजे, त्याला व्यासंगाचे रूप यायला पाहिजे, हेही खरे. वा. लं. चे एकंदर टीकालेखन पाहिले तर त्यात या सर्व गोष्टी प्रत्ययाला येतात.

वा. ल. हे हाडाचे शिक्षक, अध्यापक आहेत. आज ते मराठवाडा विद्यापीठात मराठी विभाग प्रमुख असले तरी त्यांनी आपल्या अध्यापनाची सुरुवात शिक्षकापासून केली आहे. ते बी. टी. आहेत व त्यातही ते पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले आहेत हे नव्या पिढीला माहीत नसावे. त्यांच्या अध्यापनाचा प्रवास विल्सन हायस्कूल, विल्सन कॉलेज व आता मराठवाडा विद्यापीठ ह्या क्रमाने होत आला आहे. या प्रत्येक












ठिकाणी विद्यार्थ्यांइतकेच इतर सहकाऱ्यांनाही ते किती प्रिय आहेत हे प्रस्तुत लेखकाला चांगले ठाऊक आहे. आपल्या विषयावर जसे त्यांचे नितांत प्रेम आहे, तसेच आपल्या विद्यार्थ्यांबद्दल त्यांच्या मनात कमालीची आस्था आहे. वर्गात व्याख्यानाला जाण्या-आधी आपल्या विषयाची, तो विषय आधी अनेकदा शिकवून झालेला असला तरी, जी ताजी टिपणे-टाचणे ते करतात, ती टिपणे-टाचणे पाहिली म्हणजे शिकवावयाच्या विषयाची ते किती आस्थेवाईकपणे तयारी करतात ते लक्षात येते. एखाद्या विषयात तज्ञ असणे निराळे, आणि तो विषय विद्यार्थ्यांना समजावून सांगणे निराळे. परंतु वा. ल. या दुसऱ्या प्रकारातही दर्दी आहेत याची साक्ष त्यांचे असंख्य विद्यार्थी देत असतात. आपण वा. लं. चे विद्यार्थी आहोत असे म्हणवून घेणारा एक फार मोठा वर्ग महाराष्ट्रात पसरलेला आहे. यात बी. ए., एम् ए. च्या वर्गात त्यांच्या मार्गदर्शनाखाली मराठी वाङमयाचा अभ्यास केलेला वर्ग जसा आहे तसाच ते विल्सन हायस्कूलमध्ये जेव्हा मराठी शिकवत होते, तेव्हाचाही विद्यार्थीवर्ग आहे. या असंख्य विद्यार्थ्यांच्या मनात जी प्रेमादराची भावना निर्माण झाली आहे, ती अर्थात् वा. लं. ना त्यांच्यासंबंधाने जो आपलेपणा, जो जिव्हाळा वाटतो त्यामुळेच.

परंतु वा. ल. आणि त्यांचे विद्यार्थी यांचा संबंध येथेच संपत नाही. जो विषय ते शिकवितात विषयाची आवड ते विद्यार्थ्यात निर्माण करतात. ज्या विशिष्ट वाङमयीन अभिरुचीसंबंधाने ते बोलत असतात, विचार व्यक्त करीत असतात, आणि जिच्या संबधाने ते संतत उत्साही असतात, ती अभिरुची व तो उत्साह ही विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबलेली दिसतात. इतकेच नव्हे तर ज्या तऱ्हेने ते विषय प्रतिपादन करतात व त्यासाठी जी परिभाषा ते वापरतात, ती तऱ्हा आणि ती परिभाषा त्यांचे विद्यार्थी सहीन् सही वापरताना दिसतात. अलीकडे त्यांचे इतर टीकालेख संग्रहरूपाने प्रसिद्ध झाल्यामुळे व त्यांचे वाचन इतर आस्थेवाईक विद्यार्थ्यांकडूनही होत असल्यामुळे त्यांची मते व त्यांची परिभाषा सामान्यपणे रूढ झालेली दिसते. नाहीतर काही दिवसांपूर्वी एखाद्या परि संवादात भाग घेणारा वक्ता वा. लं.चा विद्यार्थी आहे, हे चटकन् लक्षात येत असे.

वा. लं.च्या शिकवण्याचा विद्यार्थ्यांच्या मनावर कसा परिणाम होतो याचे मला माहीत असलेले एक उदाहरण देतो. वा. ल. विल्सन कॉलेजमध्ये असता-नाची ही गोष्ट आहे. एके वर्षी हुबळी-धारवाडकडील कानडी मातृभाषा असलेली व बेतावाताचे मराठी येणारी एक विद्यार्थीनी कॉलेजशिक्षणासाठी विल्सन कॉलेजमध्ये आली. तिला थोडे फार मराठी येत असल्यामुळे तिने एफ्. वाय्. आर्टस् व इंटर आर्टस् या परीक्षांना मराठी विषय घेतला. परंतु त्या दोन वर्षांच्या वा.लं.च्या शिकवण्यामुळे तिला मराठीची इतकी गोडी लागली की बी. ए. परीक्षेसाठी ऐच्छिक विषय म्हणून मराठीचीच तिने निवड केली. बी. ए. परीक्षेत चांगल्या प्रकारे उत्तीर्ण झाल्यावर साहजिकच तिने एम्. ए.ला मराठीच मुख्य विषय म्हणून निवडला. एम्. ए. ची परीक्षाही ती चांगल्या प्रकारे उत्तीर्ण झाली आणि आज महाराष्ट्रातल्या एका प्रमुख शहरी, एका प्रतिष्ठित कॉलेजात ती मराठीचे अध्यापन करीत आहे. अध्यापकाच्या अध्यापनाचा विद्यार्थ्या-वर जो परिणाम होऊ शकतो त्याचे अशा प्रकारचे उदाहरण अन्यत्र क्वचितच आढळेल.

वा. ल. आणि त्यांचे विद्यार्थी यांचा संबंध आणखीही एका प्रकाराने व्यक्त होतो. जागरूक विद्यार्थ्यांना वर्गात एखादा विषय शिकवित असताना त्या विषया-संबंधाने अनेक प्रश्न उपस्थित होऊ शकतात; अनेक वाङमयीन कूटे लक्षात येतात, आणि त्यातून आस्थे-वाईक अध्यापकाच्या विचाराला चालना मिळू शकते. मग तो त्या प्रश्नांचा पुनः पुनः विचार करतो आणि काही एक नवीन निष्कर्ष काढू शकतो. वा. लं. च्या बऱ्याच टीकालेखांचा उगम अशा प्रकाराने झालेला आहे. १९६३ साली प्रसिद्ध झालेला 'साहित्य आणि समीक्षा' हा लेखसंग्रह त्यांनी आपल्या विद्यार्थी-मित्रांना अर्पण केला आहे, तो त्याचमुळे. "ज्यांच्या-मुळे मी अनेक वाङमयीन प्रश्नांचा विचार करू शकलो, त्या माझ्या विद्यार्थीमित्रांना सप्रेम अर्पण" अशी स्पष्ट अर्पणपत्रिका त्यांनी त्या संग्रहाला जोडली आहे. वा .लं. चे अध्यापन व त्यांचे टीकालेखन यांचा हा








निकट कार्यकारणसंबंध या संग्रहापुरताच मर्यादित असेल असे नाही. तो इतरत्रही असणे सहजशक्य आहे. कारण मराठीसारख्या जिवंत भाषेच्या व तिच्यातील वाङ्मयाच्या अध्यापकाला नेहमीच स्वतः विचार करण्याची, व निष्कर्ष काढण्याची आवश्यकता असते. नित्य नव्याने निर्माण होणाऱ्या ललित साहित्याचा वेगळेपणा तपासणे, त्याची खास प्रकृती व प्रयोजन लक्षात घेणे, आणि पूर्वग्रहांचे कुठलेही विकल्प न ठेवता त्याचे मूल्यमापन करणे अवश्य असते. त्यासाठी मोजमापाच्या तयार फूटपट्ट्या उपयोगी पडतातच असे नाही. किंबहुना काही वेळा त्या अडसर म्हणूनच आड येतात. तेव्हा नव्या वाङ्मयाचे मूल्यमापन वा जुन्या वाङ्मयाचे पुनर्मूल्यमापन करण्यासाठी स्वतः अध्यापकालाच तयार व्हावे लागते. त्यासाठी, अर्थात् त्याच्याजवळ वाङ्मयाच्या स्वरूपासंबंधीची पक्की समज असावी लागते. निर्भेळ टीकामूल्यावरची पकड घट्ट असावी लागते. वाङ्मयनिर्मितीच्या पाठीमागे ज्या वेगवेगळ्या वृत्तिप्रवृत्ती असतात त्यांची दखल ठेवावी लागते. आणि वाङ्मयीन वा अवाङ्मयीन जे निरनिराळे संप्रदाय असतात, त्यांच्या प्रभावशक्तीचे मानही राखावे लागते. हे सारे साधण्यासाठी अध्यापकाजवळ चिंतनशीलता, व्यासंग व पूर्वग्रहरहितता ही जरूर असावी लागतात. तरच तो वाङ्मयासंबंधीचे आपले स्वतःचे निष्कर्ष ( formulation ) काढू शकेल. आणि या साऱ्यांच्या जोडीला पुनः आपले निष्कर्ष लिहून काढण्याची, त्यांचे अवश्य तर पुनःपुनः परिष्करण करण्याची, व त्यांची यथार्थता पारखून पाहण्याची जर त्या अध्यापकाजवळ वृत्ती असेल तर त्याच्या हातून वेगळ्या प्रकारचे लेखन होऊ शकेल. त्या लेखनावर त्याचा ठसा उमटू शकेल. वा. लं. चे लेखन या प्रकारात सामावणारे आहे. त्यांचे लेखन व त्यांचे अध्यापन यांचा संबंध समवायपद्धतीचा वाटतो, तो यामुळे.

परंतु त्यांच्या लेखनाला जो सिद्धांताचा ठामपणा आला आहे तो केवळ या अध्यापन-लेखन संबंधामुळे आला असता का ? मला वाटते, त्याला आणखीही एकदोन गोष्टींची जोड मिळाली असणे शक्य आहे. आणि ती जोड ते जे संतत वाचन करीत असतात त्या वाचनाची असावी. वा. लं. चे वाचन अद्यावत् आहे, असे म्हटले तर अतिशयोक्त वाटू नये. मराठीत नित्य नव्याने निर्माण होणारे साहित्य तर ते वाचतातच, पण पाश्चात्य वाङ्मयातही जे जे म्हणून उत्तम साहित्य निर्माण होते त्याचे ते आस्थेवाईकपणे वाचन करतात. येथे उत्तम साहित्य म्हणजे केवळ अभिजात (classic) म्हणून गणलेले साहित्यच नव्हे तर नव्यानव्या आधुनिक वृत्तिप्रवृत्तीतून निर्माण होणारे साहित्य. त्या साऱ्यांचे देशकालाच्या मर्यादा न पाळता ते वाचन करतात.इतकेच नव्हे तर तात्कालिक लोकप्रियता मिळविलेले साहित्यही ते वाचल्याशिवाय राहात नाहीत. कारण त्यातूनही तत्कालीन अभिरुचीचे व त्यामागील कारण परंपरांचे दर्शन होऊ शकते. तसेच वाङ्मय व्यवहारात कोठे काय चालू आहे, कोणत्या प्रवृत्ती बळावत आहेत व कोणत्या प्रवृत्ती मागे पडत आहेत, नव्या नव्या प्रयोगांना प्रथम कोणत्या अवस्थेतून जावे लागते, या साऱ्यांचा आलेख त्यांच्या डोळ्यापुढे स्पष्ट होत जातो. एखाद्या लेखकाचे एखादे पुस्तक वाचनात आले. कुणी सुचवले म्हणून किंवा सहज हाताशी लागले म्हणून किंवा एखाद्या पाश्चात्य नियतकालिकात अभिप्राय वाचला म्हणून —आणि ते पुस्तक जर लक्षणीय वाटले तर त्या लेखकाची सारी पुस्तके ते वाचून काढतील. इतकेच नव्हे तर जे कोणी मित्र भेटतील त्यांना त्याची उत्साहाने शिफारस करतील, त्यातील गुणदोष सांगतील व तो ग्रंथकार आपण वाचलाच पाहिजे असे ठामपणे बजावतील. त्यांच्या टीकालेखनात पाश्चात्य साहित्याचे वरचेवर उल्लेख आढळतात ते त्यामुळे. वा. लं. चे वाचनाचे हे वेड ललितसाहित्यापुरते मर्यादित खास नाही. संपूर्णपणे ललित ज्यांना म्हणता येत नाही, आणि पूर्णपणे अललितही नाहीत अशी चरित्रे व आत्मचरित्रे यांचे वाचनही त्यांनी खूप केले आहे. तोही त्यांचा आवडता लेखनप्रकार आहे. टीकावाङ्मय ते वाचतातच. मात्र त्यात एखादा टीकाग्रंथ अधिक तात्त्विक असेल, सौंदर्यशास्त्राची सूक्ष्म चर्चा करणारा असेल, आणि त्यामुळे तो सहजासहजी वाचून लक्षात न येणारा असेल तर त्याचे वाचन एखाद्या विद्यार्थ्याप्रमाणे पुनःपुनः करतात. त्यातला काही भाग मोठ्याने वाचतात. इतकेच नव्हे तर तो ग्रंथ आपण मिळून वाचूया असे आपल्या









अनुक्रमणिका

काही मित्रांना म्हणतात. आणि नुसते म्हणून थांबत नाहीत तर ती गोष्ट प्रत्यक्ष अमलात आणतात.

वाचनासंबंधीच्या त्यांच्या कटाक्षाबद्दलची एक गोष्ट सांगावीशी वाटते. ते विल्सन हायस्कूलमध्ये होते तेव्हाची ही गोष्ट आहे. दिवसभर शाळा आणि सकाळसंध्याकाळ एकदोन शिकवण्या यात सारा वेळ जाई. त्यातूनही जो काही थोडासा उरत असेल तो मुंबईत जाण्यायेण्यासाठी कसा लागतो—नव्हे पुरत नाही—हे मुंबईकरच जाणोत. अशा परिस्थितीत जे काही वाचन होईल ते लोकलगाडीत किंवा बसमध्ये. परंतु ते काही खरे वाचन नव्हे. आणि म्हणून शनिवारी सकाळची शाळा झाली की वा. ल. परस्पर पेटिट लायब्ररीत जात व सबंध दिवस तेथेच वाचनात घालवीत. त्यात नवीन नवीन आलेले पाश्चात्य ग्रंथ, आणि अनेक ताजी वाङ्मयीन नियतकालिके वाचून आठवड्याचा वचपा ते या रीतीने काढीत.

वा. लं. च्या या वाचनाच्या व्यसनाला आणखी एका व्यसनाची जोड मिळाली आहे. नुसतेच वाचन केले तर ते वाऱ्यावर विरून जाण्याची शक्यता असते. वाचणाऱ्याच्या मनावर त्याचा ठसा उमटतोच असे नाही. त्यासाठी निदान टाचणटिपणांची आवश्यकता असते. वा. ल. मुंबईला असताना त्यांच्या हातात जसे नेहमी एखादे तरी पुस्तक असे, तसेच त्याबरोबर पुस्तकांच्या आकाराची एक डायरीही असे. ही डायरी म्हणजे नवीन वाचलेल्या पुस्तकांवरची स्वतःची प्रतिक्रिया, नवीन सुचलेला एखादा विचार, एखाद्या प्रश्नावर लिहिलेले टिपण इत्यादींचे भांडार. अशा कितीतरी डायऱ्या वा. लं. च्या जवळ आहेत. त्यात त्यांच्या वळणदार अक्षरांनी— त्यांचे अक्षर कसे वळणदार व सुवाच्य आहे, हे त्यांच्या परिचितांना सांगावयास नको— कितीतरी लेखांची टिपणे-नव्हे संपूर्ण लेखसुद्धा आढळतात. मागे त्यांनी एका नियतकालिकात 'डायरीतील पाने' नांवाची लेखमाला गुंफिली ती याच डायऱ्यांच्या आधारावर.

वाङ्मयाचा आस्वाद आणि त्यांचा अभ्यास इतर कलांच्या सुजाण परिचयावाचून अपुरा पडतो हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे. पण ही स्पष्ट गोष्ट सगळ्यांना जाणवतेच असे नाही. आणि जरी जाणवली तरी मूलतः त्याला जी विशिष्ट मनोवृत्ती लागते ती नसेल तर जाणवूनही त्याचा काही उपयोग होत नसतो. वा. लं. ना ही जाणीव फार पूर्वीपासून झालेली आहे. कदाचित् त्यांनी पाश्चात्य साहित्याचे आणि कलाविष्कारासंबंधीचे जे वाचन केले त्या वाचनातूनही त्यांना हे प्रत्ययाला आले असावे. चित्रकला, शिल्पकला इत्यादी जशा कला आहेत तशीच वाङ्मय हीही एक कला आहे. तेव्हा मूलतः त्या साऱ्या समानधर्मीच आहेत. शिवाय त्यांचे परस्परांवर होणारे परिणामही लक्षणीय आहेत. ज्या निरनिराळ्या संप्रदायामुळे वाङ्मयाच्या रंगारूपात फरक होत आलेला आपण पाहतो ते संप्रदाय प्रथम चित्र वा शिल्प या कलाक्षेत्रात निर्माण झालेले आहेत. आणि मग ते वाङ्मयात शिरलेले आहेत. चित्रशिल्पादी कलांचे आपण इतिहास पाहिले तर या गोष्टी पटदिशी स्पष्ट होऊ शकतात. वा. लं. ना ही गोष्ट पटलेली दिसते. आपल्या काही टीकालेखात त्यांनी या गोष्टीची आवश्यकता प्रतिपादिली आहे. परंतु केवळ तात्त्विक दृष्टीने ही गोष्ट पटणे निराळे आणि त्यासाठी प्रत्यक्ष चित्रशिल्पादी कलांचा आवडीने आस्वाद घेणे निराळे. मुंबईत असेपर्यंत चित्र शिल्पादींचे एकही प्रदर्शन ते चुकवीत नसत. आणि अजूनही जेव्हा ते मुंबईत येतात तेव्हा जर एखादे प्रदर्शन चालू असेल तर वेळात वेळ काढून ते ते पाहून येतात. चित्रशिल्पादींचे प्राचीन अवशेष भारतात अनेक ठिकाणी विखुरले आहेत. त्यात भारतीय कलांच्या काही परंपरा दडलेल्या आहेत. या परंपरा कुठे लेण्यातील कोरीव मूर्तींच्या रूपाने , कुठे भित्तिचित्रांच्या रूपाने, तर कुठे मंदीर-मशिदींच्या वा गडकोटांच्या स्थापत्यरूपाने व्यक्त होताना दिसतात. ही रूपे काही ठिकाणी तर भग्न व उद्ध्वस्त झालेली आहेत. परंतु जे काही अवशेष आहेत त्यावरून प्राचीन भारतीय कलाविष्कारांची कल्पना येऊ शकते. त्यांच्या ओढीनेच अनेक पाश्चात्य कलाविशारद भारतात मुद्दाम येतात व ते आविष्कार पाहून जातात. आपल्याकडील साहित्यिकात ज्यांना — असे साहित्यिक थोडे आहेत— अशी ओढ आहे, त्यात वा. लं. ची गणना केली पाहिजे. दर नाताळच्या सुट्टीत, या ओढीच्या बाबत समानधर्मे असणाऱ्या








त्यांच्या शिल्पशास्त्रज्ञ (Architect) बंधूंच्या व मित्रांच्या समवेत, सहकुटुंब सफर करण्याला ते सहसा चुकत नाहीत.

वा. लं. चे व्यक्तिमत्त्व आणखी एका गोष्टीचा उल्लेख केल्याशिवाय पुरेसे व्यक्त होईल असे वाटत नाही. किंबहुना तीच गोष्ट इतरांच्या मानाने अधिक प्रभावी मानावी लागेल. आणि ती गोष्ट म्हणजे कलावाङ्मयासंबंधाने त्यांच्या मनात असणारी परमप्रीती, अमाप उत्साह. हा उत्साह किंवा ही प्रीती म्हणजे जणू त्यांच्या मनाचा स्थायी भाव आहे. मात्र तो डोळस आहे. सुजाण आहे. त्यामुळे कलावाङ्मयाच्या सौंदर्यात त्यांचे मन नुसताच रस घेऊन थांबत नाही तर त्याच्या घटकांचा, त्यांच्या परस्पर संबंधांचा तदंतर्गत विविध प्रश्नांचा शोध घेण्याचा प्रयत्न करते. त्यांच्या टीकालेखनाला जे अनौपचारिक स्फुट टिपणवजा आणि म्हणूनच नवे, ताजे— रूप आले आहे ते त्यांच्यातील या रसिक जिज्ञासू वृत्तीमुळे.

आज 'नवी' टीका म्हणून जिला संबोधिता येईल त्या प्रकारची टीका लिहिणारे मराठीत जे थोडे टीकाकार आहेत त्यात वा. ल. प्रमुख आहेत. सुरुवातीला त्यांनी लिहिलेल्या मोजक्या पण वेधक कथा सोडल्या तर गेली २५-३० वर्षे ते सतत टीकालेखन करीत आहेत. हे टीकालेखन खास कोणत्या तरी नियतकालिकासाठी, म्हणजेच वाचकांसाठी ते करीत नाहीत तर ते मुख्यतः स्वतःसाठी, स्वतःच्या शंकांच्या समाधानासाठी ते करीत असतात. वाङ्मयाचे वाचन करीत असताना त्याच्या प्रवृत्तीसंबंधाने व प्रयोजनासंबंधाने अनेक गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण होत असतात. आस्थेवाईक वाचकाला त्यांची समाधानकारक उत्तरे हवी असतात. सौंदर्याच्या विविध आविष्कारामागे अनेक वृत्तिप्रवृत्तींचे व संप्रदायांचे संबंध निगडलेले असतात. आणि या संबंधांची उकल झाल्याशिवाय जिज्ञासू रसिकाचे समाधान होत नसते. कलावाङ्मयाच्या जीवमानात जी स्थित्यंतरे होत असतात ती अपरिहार्यपणे झालेली आहेत का याचा शोध घेण्याची इच्छा बळावते. आणि मग या प्रकारच्या जिज्ञासू वृत्तीतून तो जे लेखन करतो ते मुख्यतः आत्मसुखार्थ असते. वा .लं. चे पुष्कळसे टीका लेखन या प्रकारे आत्मसुखार्थ वा आत्मसमाधानार्थ झालेले आहे. त्यामुळेच त्यात एक प्रकारचा समंजसपणा आला आहे. नव्या आविष्काराकडे, प्रयोगशीलतेकडे समंजसपणे ते पाहतात व कलात्मक दृष्टीने त्याची अपरिहार्यता जाणवली तर त्याचे स्वागत करतात तेही त्याचमुळे. १९४०-४५ च्या दरम्यान् मराठी कथेचे व मराठी कवितेचे जे आगळे, क्वचित् धक्का देणारे, रूपदर्शन झाले त्याचे वा .लं. नी स्वागतच केले. कारण मराठी वाङ्मयात जो एक सांकेतिकपणा आला होता, आशयाऐवजी विषयांना जे महत्त्व आले होते, अभिव्यक्तीची नाना प्रसाधनें निघाल्यामुळें कला म्हणजे कारागिरी असे जे मानलें जात होते आणि त्यामुळे मराठी वाङ्मयाला जी अवनतकळा आलेली होती ती अशा धीट प्रयोगावाचून दूर होणे कठीण होते. मात्र हे प्रयोग वा नवे आविष्कार सहजासहजी वाचकांच्या पर्यंत पोहोचू शकत नसतात. किंबहुना वाचकांची ते स्वीकारण्याची एकदम तयारीही नसते. त्यासाठी विशिष्ट अनुकूल वातावरण निर्माण करण्याची आवश्यकता असते. आता हे वातावरण मुख्यतः प्रयोगशील वाङ्मयीन नियतकालिकांच्यामुळे (Little Reviews) निर्माण करता येते. अर्थात् या नियतकालिकांच्या संपादकांना समंजस टीकाकारांची जोडही तितकीच आवश्यक असते. या दोघांच्या सहकार्यानेच सुजाण वाचकांचा एक लहानसा का असेना पण वर्ग तयार करणे, नव्या नव्या प्रयोगशील आविष्कारांना प्रकाशात आणणे, अज्ञात लेखकांना प्रसिद्धी देणे, आणि विशेष म्हणजे कलामूल्यांवर जे सावट चढलेले असते ते दूर करणे इत्यादी शक्य होते. महाराष्ट्रात 'प्रतिभा'—'पारिजात' पासून वाङ्मयीन नियतकालिकांची जी अभिमानास्पद परंपरा निर्माण झाली आहे तिच्याशी एक समानधर्मी समंजस टीकाकार म्हणून वा. लं. चा संबंध घनिष्टपणे आलेला आहे. 'पारिजात' च्या संपादनकार्यात रघुवीर सामंतांना साहाय्य करण्यात वा. रा. ढवळे यांच्यासमवेत ते एक होते. 'समीक्षक' मासिकाचे तर ते एक संपादकच होते. १९४४ साली सत्यकथा मासिकाचा जो कायाकल्प झाला व त्याला नववाङ्मयाच्या संगमस्थानाचे ( Form चे ) रूप








आले, त्यामागे वा. लं. चे मार्गदर्शन होते, हे मला माहीत आहे. त्यात नंतर नवकथा व नवकविता यांच्यावर ज्या लेखमाला आल्या व तत्संबंधाने ज्या योजना आखल्या गेल्या त्यातही वा. लं. चा हात होता. १९५२ नंतर १॥-२ वर्षे सत्यकथेत टीका आणि टिप्पणीचे सदर नियमितपणे येत असे. त्या सदराच्या लेखकांपैकी तेही एक होते. 'अभिरुचीच्या' संपादनाशी त्यांचा तसा साक्षात् संबंध नव्हता. पण लेखनाचे साहाय्य त्यांनी जरूर केलेले आहे. 'छंद' च्या संपादनसहायकातही ते होते हे साहित्यिकात उघड गुपित आहे. सारांश, 'पारिजात' समीक्षक पासून (किंवा आता 'प्रतिष्ठान' पर्यंत म्हणू या; कारण आता ते त्याचे संपादक झाले आहेत.) मराठीत जी जी वाङमयीन नियतकालिके निघाली, त्या साऱ्यांशी या ना त्या नात्याने त्यांचा संबंध आलेला आहे.

वा. लं. च्या एकंदर टीकालेखनाचा विचार केला तर प्रथम जाणवणारी गोष्ट म्हणजे त्यांची विशुद्ध कलावादी भूमिका. मात्र फडकेप्रणीत कलावादी जशी ही वेगळी आहे तशीच मराठीत (Romantic) हे बिरुद वापरणाऱ्या भूमिकेहूनही ती भिन्न आहे. कारण फडकेप्रणीत कलावादी भूमिकेत कलेमध्ये कारागिरीचा—तंत्राचा— जसा अंतर्भाव होतो, तसाच (Romantic) म्हणविणाऱ्या कलेत प्रत्यक्षातील काही अनुभवांना निषिद्ध म्हणून मज्जाव असतो. याउलट वा. लं. ना मान्य असणाऱ्या कलावादी भूमिकेत कारागिरीला जसा वाव नाही तसाच कोणत्याही अनुभवाला कलारूप घेण्याला हरकत असत नाही. यासाठीच तिचे वेगळेपण स्पष्ट होण्या-साठी मी तिला 'विशुद्ध' हे विशेषण लावले आहे. या भूमिकेनुसार आशय व अभिव्यक्ति यात अद्वैत असते. तसेच कला ही स्वायत्त असते. ती स्वतंत्र असते, संपूर्ण असते व स्वयंपूर्ण असते. त्यामुळे कलेच्या प्रांतात श्लीलाश्लीलतेचा प्रश्नच उत्पन्न होत नाही. अश्लीलता म्हणजे एक प्रकारचे रसविघ्न. म्हणून एखादे लेखन अश्लील असणे शक्य आहे. पण मग ते कलात्म नसेल, आणि जर ते कलात्म असेल, कलारूप घेऊन व्यक्त झालेले असेल, तर मग ते अश्लील असणेच शक्य नाही. आणि म्हणूनच प्रत्यक्षातील जीवनमल्ये आणि कलामूल्ये यांची गल्लत करता कामा नये. कलेबाबतचा निर्णय कलावादी मूल्यांनीच केला पाहिजे. शुद्ध कलावादी भूमिकेचे हे स्पष्टीकरण एवढ्याचसाठी केले की त्यावरून वा. लं. ची कला-विषयक भूमिका स्पष्ट व्हावी. आणि मराठीत कला-वादी, जीवनवादी, आशयवादी, आकृतिवादी, समाजसत्तावादी, इत्यादी नावांच्या चिठ्यांनी (Labels) जे कलेसंबंधीचे दृष्टीकोण व्यक्त होतात, त्याहून वा. लं. च्या दृष्टीकोणाचा वेगळे-पणा स्पष्ट व्हावा.

वा. लं. च्या टीकालेखनातील कलावाङमय-विषयक भूमिकेचा हा गाभा लक्षात घेतला तर वाङमयाच्या एकंदर प्रकृतिप्रयोजनासंबंधाने ज्या विशिष्ट रूपांनी ते व्यक्त होते त्या रूपसिद्धीसंबंधाने किंवा एखाद्या वाङमयकाराच्या संपूर्ण वाङमयाच्या सम्यक् दर्शनासंबंधाने ते ज्या प्रकारे विचार करतात, म्हणजे त्यांची ही समीक्षा कोणत्या रूपगुणांनी होत असते, त्याची थोडीफार कल्पना येईल. आजवर, 'वाङमयातील वादस्थळे', 'वाङमयीन मते आणि मतभेद', 'वाङमयीन दृष्टी आणि दृष्टिकोण', वाङमयीन टीपा आणि टिप्पणी', आणि 'साहित्य आणि समीक्षा' असे त्यांचे पाच लेखसंग्रह प्रकाशित झाले आहेत. 'वामन मल्हार वाङमयदर्शन', श्रीपाद कृष्ण वाङमयदर्शन', आणि 'नाटककार खाडिलकर : एक अभ्यास' हे व्यक्तिवाङमयदर्शनात्मक अभ्यास (Author studies) वेगळे. या खेरीज प्रका-शित पण असंगृहीत असे लेख पुष्कळ आहेत. 'वाङमयीन दृष्टी आणि दृष्टीकोण' या संग्रहाला त्यांच्या टीकात्मक लेखांची जी सूची जोडली आहे ती पाहिली म्हणजे वा. लं. चे टीकालेखन वाङमय व्यवहाराच्या सर्वांगाना कसे स्पर्श करते, याची कल्पना येते. पैकी त्यांच्या लेखसंग्रहातील स्फुट लेखांचा विचार केला तर त्यांतील सर्वात अधिक लेख ललित वाङमय आणि ललित कला यांचा तात्त्विक विचार करणारे आहेत. या तत्त्वचर्चात्मक लेखात कलेची प्रकृती, तिचे प्रयोजन, अभिव्यक्त रूपाचे सौंदर्य ज्या भाषेतून व्यक्त होते ती भाषा इत्यादी अनेक विषय तर येतातच, पण त्याचे जोडीला 'कला आणि चारित्र्य', कला आणि स्वातंत्र्य यासारखे कला-

व्यापाराशी संबद्ध असेही विषय आढळतात. या सर्वांचा विचार शोधक वृत्तीने केला जातो. कालांतराने आधी केलेला विचार जर अपुरा वाटला तर त्याचा फेरविचारही केला जातो. 'ललितवाङ्मयाची भाषा' हा 'वाङ्मयीन वादस्थळे' यातील लेख व त्याच नावाचा 'साहित्य आणि समीक्षा' यातील लेख याची साक्ष म्हणून देता येईल. कलेचेही एक जीवशास्त्र असते त्या शास्त्रात टीकाकार पारंगत तर हवाच पण त्याबरोबरच कलेच्या आदितत्त्वांचा त्याला शोध घेता आला तर उत्तम. तसेच हे आदितत्त्व कोणकोणत्या रूपांनी अवतरू शकते, त्या रूपांचेही घटक कोणकोणते असतात, तसेच त्यांचे परस्पर संबंध काय असतात इत्यादिकांचा बोध जर टीकाकाराला झाला तर अधिकच उत्तम. त्या टीकाकाराला तत्त्वचिंतक, स्वतंत्र विचारप्रणाली मांडणारा टीकाकार असे म्हणणे मग रास्त ठरेल. वा. लं. च्या तत्त्वचिंतनात्मक वाङ्मयविचाराचा प्रवास त्या दिशेने होतो आहे, असे म्हटल्यास वावगे ठरू नये.

कलावाङ्मयाच्या मूळ आदितत्त्वाच्या, त्याच्या प्रकृतिप्रयोजनाच्या विचारानंतर त्याच्या विविध आविष्कारांचा विचार ओघानेच येतो. या आविष्कारांचेच रूढ नाव म्हणजे वाङ्मयप्रकार. वाङ्मयप्रकार म्हणजे आविष्काराच्या विविध तऱ्हा. या बाहेरून येत नसतात. तर त्या कलावाङ्मयाच्या मूळ प्रकृतिनुरूप व्यक्त होत असतात. नाटक, कादंबरी, कविता, एकांकिका, नाटयछटा इत्यादी त्यांची प्रचलित नावे. आणि म्हणून वाङ्मयप्रकारांचा, व त्यातील कलाकृतींचा विचार करताना हे भान सतत राखावे लागते. वा. लं. नी हे भान राखले आहे आणि ते राखून पुनः तत्संबद्ध अनेक प्रश्नांचा विचार केला आहे. या संदर्भात लघुकथेच्या स्वरूपासंबंधी, तिच्या उत्क्रांतीमार्गासंबंधी त्यांनी ज्या प्रकारे विवेचन केले आहे. ते उदाहरण म्हणून देता येईल. वर 'वाङ्मयीन दृष्टी आणि दृष्टिकोण' या संग्रहातील ज्या सूचीचा उल्लेख केला आहे त्या सूचीवर नुसती नजर फिरविली तरी वा. लं. ची टीकादृष्टी वाङ्मयव्यवहाराच्या अंगोपांगावर कशी चौफेर संचार करते हे लक्षात येते.

जी गोष्ट स्फुट टीकालेखनाची तीच गोष्ट 'वामन मल्हार : वाङ्मय दर्शन', 'श्रीपाद कृष्ण : वाङ्मयदर्शन' आणि 'नाटककार खाडिलकर: एक अभ्यास' या वाङ्मयकारांच्या वाङ्मयाभ्यासाची. येथे प्रथम जाणवते ते हे की येथील सारे वाङ्मयदर्शन स्वतः वा. लं. चे आहे. येथे कुणाच्या मताचा अनुवाद नाही, की उसनवारी नाही किंवहुना वर्णित विषयासंबंधाने जे काही आधी लिहिले गेले असेल त्याच्या अवतरणांनी आपले लेखन विद्वत्प्रचुर करण्याचा प्रयत्न नाही. तसेच कुणाला उत्तरेप्रत्युत्तरे देण्याच्या भरीला पडून आपल्या लेखनाला वादविवादाचा आखाडा बनविण्याचा हेतुही नाही. प्रथम वाङ्मयकाराचा वाङ्मयीन पिंड, त्याचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व वा त्याची प्रकृती लक्षात घ्यावयाची. आणि मग त्याने निर्माण केलेल्या कलेत जे सौंदर्य आढळेल वा ज्या उणीवा जाणवतील त्या सौंदर्याचा व त्या उणीवांचा स्पष्टपणे पण शुद्ध कलात्मक दृष्टीने विचार करून निष्कर्ष काढावयाचा. ही एक त्यांची वाङ्मयकारांच्या वाङ्मयाभ्यासाची सर्वसामान्य पद्धत आहे. मात्र हे निष्कर्ष काढीत असताना अवश्य ती ऐतिहासिक व तौलनिक दृष्टीही जरूर बाळगलेली दिसते. या संदर्भात 'वामन मल्हार जोशी व त्यांचा काळ' आणि 'नाटककार खाडिलकरांचा काळ' : मराठी नाटयसृष्टी' हे जे दोन परिशिष्टवजा आराखडे अनुक्रमे 'वामन मल्हार : वाङ्मयदर्शन'. आणि नाटककार खाडिलकर' या ग्रंथांना त्यांनी जोडली आहेत ते पहावेत. म्हणजे वामन मल्हारांचा विचार त्यांच्या काळाच्या संदर्भात व खाडिलकरांच्या नाटकांचा विचार तत्कालीन नाटयसृष्टीच्या संदर्भात करणे वा. लं. ना अवश्य कसे वाटले हे लक्षात येते. शिवाय वामन मल्हार व खाडिलकर यांच्या काळाचा विचार त्यांच्या त्यांच्या जन्मकाळापासून ते करीत असल्याने एकंदर विवेचनाला ऐतिहासिक दृष्टीही आपोआप लाभली आहे. मात्र वा. लं. च्या टीकालेखनाचे सामान्यपणे जे टिपणवजा अनौपचारिक स्वरूप असते ते येथेही उतरल्याशिवाय राहिलेले नाही. "अभ्यासाविषयाच्या संबंधात अभ्यास चालू असताना जसजसे नवे विचार सुचतील तसतशी छोटी छोटी टिपणे करणे, व ती

परत परत तपासून निर्दोष करीत बसणे ही माझी सवय आहे. असली टिपणे औपचारिक लेखनापेक्षा अधिक प्रस्तुत व टोकदार ठरतात. असा जो आपला अनुभव "नाटककार खाडिलकर : एक अभ्यास" यांच्या प्रास्ताविकात ते देतात तो उगाच नव्हे.

वा. लं. च्या टीकालेखनाचे स्वरूप सामान्यपणे या प्रकारचे आहे. ते एका वाङ्मयभक्ताने जिज्ञासूपणे केलेले वाङ्मयरहस्यसंशोधन आहे. वाङ्मयेतिहास दृष्टीची त्यात दखल आहे तशीच चौफेर व्यासंगाची त्यात खूण आहे. येथे मराठीचा व्यासंगी प्राध्यापक आणि चोखंदळ दृष्टीचा टीकाकार यांचा समन्वय साधला आहे. मराठीतील वाङ्मयविचार वा गंभीर स्वरूपाचे वाङ्मयविषयक लेखन आणि विद्यापीठीय अभ्यासक्रम ही दोन्ही अधिक जवळ येत चाललेली दिसत आहेत. नाहीतरी विद्यापीठीय अभ्यासक्रम आणि मराठीतील टीकात्मक, वाङ्मयेतिहासात्मक, इत्यादी स्वरूपाचे लेखन या दोहोंचे विकासक्रम समांतर असल्याचे आढळतात. ते परस्पराश्रयी आहेत असे निखालस म्हणता येणार नाही, हे खरे. परंतु ते एकमेकावर परिणाम करीत आले आहेत. हेही तितकेच खरे आहे. आणि म्हणून येत्या हैदराबाद साहित्य संमेलनाला या दोहोंचा समन्वय ज्यांच्यात साधला आहे असा अध्यक्ष लाभला, ही या दृष्टीने मोठी आनंदाची गोष्ट आहे. वा. ल. एक व्यासंगी टीकाकार जसे आहेत, तसेच महाराष्ट्रातल्या एका विद्यापीठाचे ते मराठी विभागप्रमुख आहेत. १८ व्या शतकातील सुरुवातीच्या नियतकालिकांचा सध्या ते अभ्यास करीत आहेत. तत्संबंधाचे त्यांचे काही निष्कर्ष प्रकाशनाच्या मार्गावरही आहेत. त्यांचे हे वैयक्तिक लेखन असेच चालू राहील आणि रहावेही. परंतु विद्यापीठीय पातळीवरून व्यापक स्वरूपाच्या काही योजना आखल्या जाणे अवश्य वाटू लागले आहे. काही काही लेखन एकहाती होणे कठीण असते. उदा० वाङ्मयेतिहासातील विवक्षित कालखंडाचा विशेष अभ्यास (Period study) वाङ्मयाचा वाङ्मयीन दृष्टिकोणातून लिहिलेला इतिहास, मराठी वाङ्मयातील वेगवेगळ्या धार्मिक सांप्रदायांचा व त्यांच्या प्रेरणेतून निर्माण झालेल्या साहित्याचा अभ्यास, असे कितीतरी अभ्यास आयोजित करून कार्यवाहीत आणणे विद्यापीठीय पातळीवरून अधिक शक्य व्हावे. महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे मराठी वाङ्मयेतिहासाची योजना मार्गस्थ झालेली आहे व प्रा. रा. श्री. जोगांच्या संपादकत्वाखाली एक खंडही प्रकाशित झालेला आहे, या गोष्टीचा येथे विसर पडलेला नाही. वाङ्मयीन संस्थांचे तेही एक कार्य असते व त्या दृष्टीने महाराष्ट्र साहित्य परिषदेचा हा उपक्रम स्तुत्यच आहे. परंतु वाङ्मयीन संस्थांच्या जोडीला विद्यापीठांनाही त्यात लक्ष घालणे इष्ट वाटते. यंदाचे अध्यक्ष महाराष्ट्रातल्या वाङ्मयसंस्थांचे जसे प्रतिनिधी आहेत तसेच एका विद्यापीठाचे मराठी विभागप्रमुख आहेत. या दृष्टीने त्यांच्या अध्यक्षीय भाषणात अशा काही योजनांचा उच्चार झाला व तत्संबंधाने मार्गदर्शन झाले तर ते स्वागतार्ह ठरणार नाही का ?

---








# सार--संकलन

## पेकिंगची क्रांतिकारक संयुक्त राष्ट्रांची संकल्पित योजना

प्रत्यक्ष संयुक्त राष्ट्रांमध्येच क्रांतिसंघर्ष घुसवावा म्हणून चिनी कम्युनिस्टांचे प्रचारयुद्ध चालू असताना विश्वशांतीचा शोध करण्या करिता संयुक्तराष्ट्रांचे विसावे अधिवेशन सुरू झाले आहे. संयुक्तराष्ट्रांच्या सदस्याची जागा मिळविण्याचा, तसा वार्षिक हक्क मिळविण्याचा उद्देश उघडपणे चीनने सोडला नसला तरी शब्दांनी व कृतींनी या विश्वसंघटनेबद्दलची उपेक्षावृत्ती व किंबहुना तिरस्कार व्यक्त केला आहे. भारत व पाक यांच्यामध्ये शांतता स्थापित करण्याकरिता अगदी अलीकडे निःपक्षपाती मार्गदर्शन व विवेकयुक्त संयम संयुक्त राष्ट्रांतर्फे विश्वसमाजाने दाखविला असताना पेकिंगने संयुक्तराष्ट्रांची अवहेलना केली व भारताला आव्हान देऊन लढाईने हा प्रश्न सोडविण्याचा धाक दाखविला. केवळ अन्तर्गत भेद पाडण्याची संधी प्राप्त व्हावी म्हणूनच कम्युनिस्ट चीन संयुक्तराष्ट्रांच्या परिषदेत प्रवेश मिळविण्याचा आग्रह धरत आहे, असे म्हणावे लागते.

पूर्वी संयुक्त राष्ट्रांच्या सदस्यत्वाची सर्व राष्ट्रांना कसलीही अट न ठेवता मोकळीक असावी, असे काही सदस्यांचे म्हणणे होते. उलट काही सदस्यांनी असा प्रश्न उपस्थित केला की मग हे सदस्यत्व अर्थपूर्ण राहील काय? आणि असे विचारले की, संयुक्तराष्ट्रांच्या वर्तमान सनदेप्रमाणे प्राप्त होणाऱ्या जबाबदाऱ्या पत्करणाऱ्या शांतताप्रिय राष्ट्रांनाच सदस्यत्व प्राप्त होते म्हणून तशी योग्यता माओ-त्से-तुंगच्या चीनच्या ठायी आहे काय? अलीकडे काही सदस्यांनी असाही प्रश्न विचारला की वर्तमान काश्मीर-पेचप्रसंगी त्वरित आणि निश्चयी वर्तनाची गरज लागली तसे वर्तन लाल चीन साधारण सभेचा व सुरक्षा समितीचा सदस्य असता तर संयुक्तराष्ट्रांना करणे शक्य झाले असते काय?

सन १९४५ मध्ये ही संस्था निर्माण झाल्यापासून चिनी गणराज्य (फार्मोसा) सदस्य आहे व जबर आर्थिक मदत देणारे आहे; आणि पेकिंगला सदस्य केल्यास चिनी गणराज्य (फार्मोसा) सदस्य रहाणार नाही; ही शृंगापत्ती प्राप्त होते. पेकिंगच्या मंडळींना संयुक्तराष्ट्रांचे सदस्य खरोखर बनायचे की नाही यातच या अत्यंत गूढ कोड्याचे उत्तर साठलेले आहे.

## छपलेली कल्पनाचक्रे !

'पुनःसंघटित' व 'क्रांतिकारक' अशा स्वरूपातील संयुक्त राष्ट्रसंघटनेची मागणी कम्युनिस्ट चीन करीत आहे, आणि जर त्या संस्थेचे सदस्यत्व त्याला देऊ केले तर स्वतःच्या अटीवरच ते घेण्याची इच्छा दर्शवीत आहे. पेकिंगच्या बाजूचे जे आहेत त्यांनाही लाल चीनची बाजू मांडायची तर कसले फेरबदल केले म्हणजे पुनःसंघटना झाली असे त्याला वाटेल तेही कळत नाही. यावर्षी संयुक्त राष्ट्रांच्या दोन मुख्य संस्थांमध्ये मुख्य बदल झाले तरी पेकिंगच्या हल्ल्यांचे स्वरूप मऊ झाले नाही. एकोणिसाव्या अधिवेशनाने सनदेला पुस्ती जोडून सुरक्षा समितीचे ११ च्या ऐवजी १५ सदस्य आणि आर्थिक व सामाजिक समितीचे १८ च्या ऐवजी २७ सदस्य ठरविले. नवी स्वतंत्र राष्ट्रे आल्यामुळे १९ व्या अधिवेशनात मूळच्या ५१ सदस्यसंख्येच्या ठिकाणी ११४ सदस्यसंख्या ठरली; त्यामुळे वरील बदल करावे लागले.

परंतु पेकिंगची प्रसिद्ध झालेली गूढ अक्षरे नीट उलगडली तर असा अर्थ निघतो की, लाल चीनला "तिसरे जग" आणि "पुर्नविवरणविरोधी" (रशियनगटविरोधी) कम्युनिस्ट राष्ट्रे स्वतःशी निगडित होण्याकरिता नवी राष्ट्रसंघटना उभारायची आहे. त्या संघटनेने पश्चिमी राष्ट्रांवर प्रभाव गाजविला पाहिजे व त्यांच्याशी संघर्ष चालविला पाहिजे. पूर्वी येनानमध्ये असताना माऊ-त्से-तुंग अलग पडला होता व तीव्र लढाई लढत होता; त्याच स्थितीचा प्रभाव चीनच्या आंतरराष्ट्रीय संबंधावर अजून पडलेला आहे. नवोदित राष्ट्रांना शांततामय आंतरराष्ट्रीय जग निर्माण करण्याची आवश्यकता वाटते, या विचारापासून हा गूढ दृष्टिकोण दुरावला आहे, हे चिनी मंडळींना समजत नाही.








पेकिंगला जगाच्या या मंचावर आणले तर चीनच्या चढाऊपणाची धार कमी होईल, मर्यादित होत जाईल अशी उमेद बाळगणारे मुत्सद्दी यामुळे गोंधळू लागले आहेत. जिज्ञासू मंडळी, हे काही असले तरी, माओच्या तर्कशास्त्राचे धागे कोठपर्यंत जातात, याचा उलगडा करण्याचा प्रयत्न करीत आहेत.

## विरोधी द्वन्द्वे

पेकिंगने संयुक्तराष्ट्रे अमेरिकेचे आधिपत्याखाली काम करतात असा आरोप केलेला असला तरी या चालू साली इंडोनेशिया त्या संघटनेतून बाहेर पडल्यावर पेकिंगच्या विरोधी प्रचाराला जोर चढला आहे. चीनच्या प्रेरणेने ही बहिष्काराची कृती घडली ही गोष्ट ध्यानात न घेतली तरी चीनची पद्धतीच सुकार्नोच्या धोरणात दिसून येते.

मलेशियाचे अस्तित्व, ते नवे साम्राज्यवादी राष्ट्र आहे म्हणून इंडोनेशियाने अमान्य केले आहे. त्याला जर संयुक्त राष्ट्रांच्या सुरक्षा समितीवर निम्मे कालमर्यादेपर्यंत बसण्याकरिता निवडले तर आम्ही बहिष्कार घालू असा धाक सुकार्नोने घातला होता. ( एका राष्ट्राची दुसऱ्या राष्ट्राला मान्यता असण्याच्या मुद्याचा संयुक्तराष्ट्रांच्या प्रतिनिधित्वाशी काही संबंध नाही, हे त्या संघटनेने अगोदरच ठरविले आहे. ) इंडोनेशियाने संयुक्तराष्ट्रातून अंग काढून घेतल्यावर काही राष्ट्रांना आश्चर्याचा धक्का बसला, व त्यांनी अशी तक्रार केली की, या कृतीमुळे तटस्थ राष्ट्रांच्या यावेळी अत्यंत आवश्यकता असलेल्या एकजुटीला धक्का बसेल. याप्रसंगी सुकार्नोची बाजू घेऊन पेकिंगने असे उघड केले की, आंतरराष्ट्रीय तडजोडीची कल्पना आणि राष्ट्रीय सार्वभौमत्वाचे तत्त्व यांच्यात असलेला संघर्ष यावरून सिद्ध होतो :

"इंडोनेशियाने केल्याप्रमाणे प्रत्येक देशाने आपल्या राष्ट्राची इभ्रत व सार्वभौमत्व यांचे संरक्षण केले तर राष्ट्राराष्ट्रांमधील स्वातंत्र्य व परस्परांबद्दलचा आदर यावर आधारलेल्या राजनीतीची अभिवृद्धी होऊ लागेल."

बहुमताच्या सत्तेचा मान राखण्याप्रीत्यर्थ हे राष्ट्राराष्ट्रांमधले संघर्ष काही सवलती सहन करू शकत नाहीत, असे यांतील गृहीतकृत्य आहे; या तत्त्वज्ञानाने संयुक्तराष्ट्रांची सनद अशक्य ठरेल.

वाढत्या ईर्षेने या संघटनेवर चीनचा हल्ला सुरू झाला आहे. पहिला मुद्दा असा की, हे अमेरिकेच्या हातातील साधन आहे :

"संयुक्त राष्ट्रे हे संघटन अमेरिकन साम्राज्यवाद्याच्या आक्रमणाचे हत्यार आहे; जुन्या व नव्या वसाहतवादाचे कुप्रसिद्ध हस्तक आहे; थोडयाशा सत्तांचा लूट वाटून घेण्याचा घाणेरडा अड्डा आहे."

परंतु एवढे मात्र खरे की सदस्य असलेल्या आफ्रिकी-एशियाई राष्ट्रांना अपमानित करण्याचा प्रयत्न टाळून त्याना असे बजावले आहे की तुम्हास फसवून तुमचा उपयोग संयुक्त राष्ट्रांतर्फे मोठी राष्ट्रे करीत आहेत :

"संयुक्तराष्ट्रे म्हणजे मूठभर बडया राष्ट्रांनी आंतरराष्ट्रीय राजनीतीचा शेअरबाजार बनविला आहे ; दुसऱ्या राष्ट्रांच्या विशेषत: छोटयांच्या सार्वभौमत्वाची खरेदीविक्री शेअरप्रमाणे तेथे बहुतेक चालू राहते."

इतक्या प्रास्ताविकानंतर चौ-एन्-लायने नवा मुद्दा मांडला आहे तो असा की, पेकिंगच्या विश्वविषयक दृष्टिकोनाशी अधिक सुसंगत अशी संयुक्तराष्ट्रांची पुनर्घटना करणे आहे :

"संयुक्तराष्ट्रांनी फारच चुका केल्या आहेत; आफ्रिकी व आशीयाई राष्ट्रांना निराश केले आहे. त्या चुका दुरुस्त केल्या पाहिजेत; संयुक्त राष्ट्रांची संपूर्ण पुनर्घटना होणे आवश्यक आहे. . . . . .या परिस्थितीत क्रांतिकारक संयुक्तराष्ट्रसंघटना उभारली की या जुन्या संयुक्तराष्ट्रांशी प्रतिस्पर्धी नाटचप्रसंग रंगमंचावर आणता येतील. ही जुनी संस्था अमेरिकन साम्राज्यशाहीची हस्तक बनून केवळ अतिप्रसंग निर्माण करीत आहे, अत्यंत निरुपयोगी बनली आहे."

ही अशी विधाने अजून संदिग्धच आहेत परंतु यामुळे इंडोनेशिन हेरल्डचे एक वृत्त खरे असण्याची शक्यता वाढते; ते वृत्त असे की, "जकार्ता येथे काही थोडचा दिवसांपूर्वी चौ-एन्-लाय असे म्हणाले की, संयुक्तराष्ट्रांचे सदस्यत्व मिळविण्याची चीनला इच्छाच नाही." त्या पत्राच्या संपादकीय मजकुरात पुढे असे म्हटले की :








"नेफोच्या ( NEFO )* जगाचा एक आधार-स्तंभ असलेल्या चीनने संयुक्त राष्ट्रांमध्ये सामील का व्हावे ? कारण संयुक्तराष्ट्रे म्हणजे सर्व प्रकारच्या वसाहतवादाचे ( Necolim ) विश्वाधिपत्य गाजविण्याचे साधन होय. चौ-एन्- लायने जाहीर केलेली गोष्ट भोळ्या भावड्यांना सोडले तर कोणाही राजकीय निरीक्षकाच्या अगोदरच लक्षात आलेली असणार."

## एका जगातून दोन जगे

जेव्हा एखादे राज्य स्वतः क्रांतिकारक नीतिशास्त्रास वाहून घेते, उदाहरणार्थ, कम्युनिस्ट चीन, तेव्हा ते राष्ट्र आंतरराष्ट्रीय कायदा वा विश्वराष्ट्रांची व्यवस्था यांच्याबद्दल आस्था दाखवीत असेल तर तो केवळ मुत्सद्देगिरीचाच भाग समजावा. आंतरराष्ट्रीय कायदा वा विश्वराष्ट्रांची सुव्यवस्था यांच्या रक्षणार्थ संयुक्तराष्ट्रे आहेत; ह्या संघटनेसंबंधी असलेले पेकिंगचे धोरण हे चीनच्या विद्यमान संपूर्ण धोरणाचाच भाग म्हणून पाहिला पाहिजे.

अलीकडे काही वर्षे चीनचा क्रांतिकारक सिद्धान्तवाद कठोर बनत आहे, आणि तो वस्तुवादापासून दूर जात आहे. राष्ट्रीय संरक्षणखात्याचा मंत्री व पोलिट ब्यूरोचा सदस्य लिन पिअओ याने चीनचे आंतरराष्ट्रीय आसन दर्शित करणारे व विविध कल्पनांचा समन्वय करणारे वक्तव्य नुकतेच प्रसिद्ध केले आहे. ज्या पद्धतीने चीनमध्ये कम्युनिस्टांनी सत्ता काबीज केली त्या पद्धतीशी सुसंगत अशी विश्वक्रांतीची साधनयोजना लिन पिअओ सांगतो :

"एकंदर भूगोल दृष्टिपथात ठेवल्यास उत्तर अमेरिका व पश्चिम यूरोप जगाची शहरे म्हणावी लागतात; आणि त्यामुळे आशिया, आफ्रिका व लॅटिन अमेरिका हा जगाचा ग्रामीण भाग ठरतो. वर्तमान विश्वक्रांतीच्या चित्रपटावर एका अर्थी ही शहरे विश्वाच्या ग्रामीण प्रदेशांनी वेढलेली दिसतात. जगाच्या लोकसंख्येतील आशिया, आफ्रिका व लॅटिन अमेरिका यातील प्रचंड संख्येच्या जनतेच्या क्रांतिकारक संग्रामावर विश्वक्रांतीचे उद्दिष्ट अवलंबून आहे ; असे अंतिम विश्लेषणात दिसते."

आंतरराष्ट्रीय संबंधाच्या कल्पनासंबंधी चिनी मंडळी अगदी प्रांजळ आहेत. जग हे दोन शिबिरांमध्ये विभक्त झाले असून त्यापैकी एकाने दुसऱ्यावरील आधिपत्याकरिता अखेरपर्यंत झगडले पाहिजे. लिनच्या लेखात या आंदोलनाने अनुसरण्याचा तपशील दिला आहे; प्रथम साम्राज्यशाहीविरोधी राष्ट्रीय लोकशाही क्रांती घडून येईल; त्या राष्ट्रीय लोकशाही क्रांतीतून समाजवादी क्रांती उद्भवेल.

यापुढे जाऊन लिन असे दाखवितो की, माओ-त्से-तुंगच्या सिद्धान्ताप्रमाणे मार्क्सवाद–लेनिनवादाचे हत्यार धारण करणाऱ्या पक्षानेच ह्या क्रांतीचे नेतृत्व केले पाहिजे. व त्यालाच करणे शक्य आहे; इतर कोणत्याही वर्गाने वा पक्षाने नव्हे. क्रांतीच्या दोन्ही अवस्थांमध्ये कम्युनिस्ट नेतृत्वच अक्षत टिकविणे आवश्यक आहे.

माओ-त्से-तुंगच्या क्रांतिविवरणाचा आधार देऊन लिन पिअओ आंतरराष्ट्रीय समाजाला कम्युनिस्ट चीनचा विश्वविचार व संयुक्तराष्ट्रांची उद्दिष्टे यातील मूलभूत भेद दाखवून देतो :

"क्रांतीचा मुख्य उद्यम व उच्चतम आकार म्हणजे सशस्त्र शक्तीने सत्ता काबीज करणे आणि युद्धद्वारा प्रश्नाचा निर्णय करणे हा होय. मार्क्सवाद-लेनिनवादाचा हा क्रांतिसिद्धान्त चीनला व अन्य सर्व देशांना सारखाच सम्यक लागू पडतो.

## तटस्थता नको

याप्रसंगी अशी मांडणी स्पष्टपणे पुनः केली, ही गोष्ट अर्थपूर्ण आहे ; कारण यावेळी विशेषतः चीनने भारताला व दक्षिण व्हिएटनामला धोका निर्माण केला आहे, आफ्रिकेत आंदोलन सुरू केले आहे, आणि संयुक्तराष्ट्रांच्या शांतताप्रयत्नांवर हल्ला चढवून तुच्छता दर्शविली आहे. परंतु या धोरणात नवे असे काहीच नाही. कारण चीनने असा संकेत कधीच स्वीकारला आहे की, कम्युनिझमचा विश्वविजय होईपर्यंत हे जग असेच विभक्त राहणार आहे. पूर्वी

* NEFO म्हणजे New Emerging Forces नव्या उदय पावणाऱ्या शक्ती व Necolim म्हणजे neo-colonialism, ( नवा वसाहतवाद ), colonialism ( वसाहतवाद ) व imperialism ( साम्राज्यवाद ).






म्हणजे सन १९२६ मध्येच माओ-त्से- तुंगने विश्व-परिस्थितीचे असे विश्लेषण मांडले आहे की, कम्यु-निस्टांचे तिसरे इंटरनॅशनल एका बाजूला व क्रांति-विरोधी राष्ट्रसंघ दुसऱ्या बाजूला आहे. सन १९४८ च्या चीनच्या मुख्य राजनीतीचे विवरण करणाऱ्या पुस्तकात चीनचा विद्यमान अध्यक्ष लिऊ शाओ-ची असा इशारा देतो की, एकाची वा दुसऱ्याची बाजू न घेता तटस्थ राहणे अशक्य आहे.

काश्मीरसंबंधातल्या भारत-पाक संघर्षातील चीनची प्रतिक्रिया हेच दर्शित करते की, तटस्थता-विरोधी असलेला चिनी दृष्टिकोण पूर्वीप्रमाणे कायम राहिला आहे. "संयुक्तराष्ट्रे म्हणजे आक्रमक भारताचे पवित्र आश्रयस्थान" या विस्तृत संपादकीय अग्रलेखात पेकिंगने संयुक्तराष्ट्रांवर हल्ला करताना असा दोष दिला आहे की, संयुक्तराष्ट्रांनी या संघर्षात एक बाजू धरली नाही; शस्त्रविरामाची आज्ञा दिली आणि बरोबर कोण व अपराधी कोण हे ठरविले नाही. भारताने पाकवर प्रचंड प्रमाणात सशस्त्र हल्ला केला असताना संयुक्तराष्ट्रांनी, अत्यंत लज्जा-स्पद कारवाई केली, असे चिनी मंडळी म्हणत आहेत; त्याचप्रमाणे, उ थांट हा वाशिंग्टनचा राजकीय दलाल म्हणून वर्तन करीत आहे' असे म्हणून दोषी ठरविले आहे. भारत हा तिबेट-सिक्किमकडच्या चिनी हद्दीत लष्करी बांधकाम करीत आहे म्हणून भारताला निर्वाणीचा खलिता पाठवून वरील पेच-प्रसंगात चीनने भर घातली आहे. यामुळेच सोविएट रशियाला 'या ज्वालांमध्ये कोणत्याही सरकारने अधिक इंधन टाकू नये' असा इशारा द्यावा लागला.

### क्रांतिकारी संयुक्त राष्ट्रे

चीनला क्रांतिकारी संयुक्तराष्ट्रांची गरज आहे; निदान प्रस्तुत संयुक्त राष्ट्रांच्यामध्ये फूट पडून तसे दोन गट तयार व्हावे ही गोष्ट चीनच्या दोन विश्वे, या कल्पनेतून निष्पन्न होते. पेकिंगच्या परिभाषेत असे म्हणता येते की, जगातील शहरांच्या विरुद्ध आशिया, आफ्रिका ,अमेरिका येथील ग्रामीण भागांची एकजूट व्हावी. अर्थात् असेही गृहीत धरता येते की मलेशियासारखा ग्रामीण भाग हा नववसाहतवादी म्हणून शहरांच्या बाजूस टाकता येतो. पेकिंगच्या मते सुधारवादी (Revisionist) सोविएट रशिया हा आफ्रो-आशियाई गटात येत नाही म्हणून त्यालाही वगळून पश्चिमी गटात टाकावे लागेल.

लिन पिअओ—ची विभक्त जगाचे दोन भाग या कल्पनेशी जुळतेच अध्यक्ष सुकार्नोचे ही नव्या उदयास येणाऱ्या शक्ती व जुन्या स्थिरावलेल्या शक्ती हे वर्गीकरण आहे. इंडोनेशिया संयुक्त राष्ट्रांमधून फुटून निघाल्याने हे स्पष्ट झाले की, नव्या उदयास येणाऱ्या शक्ती आपली संघटना संयुक्त राष्ट्रांशी स्पर्धा करण्याकरिता स्थापित करतील, अशी सुकार्नोला आशा आहे. ऑगस्ट १९६६ मध्ये उद्घाटन नियोजित करून इमारतींचा समूह बांधण्यास जकार्तात प्रारंभ झाला आहे; ११ मजली सचिवालयाचा त्यात अन्त-र्भाव आहे; २५०० खुर्च्या राहतील अशा सभागृहा-करिता कम्युनिस्ट चीन सामग्री पुरवीत आहे. अशा प्रकारे साहाय्य व उत्तेजन देत असताही चीनने अजून अशी संयुक्त राष्ट्रविरोधी संघटना उभारण्यास स्पष्टपणे बांधून घेतले नाही. कॉनेफो या विरोधी संघटनेच्या उपयुक्ततेबद्दल वाट पाहण्याचे धोरण चीनने अवलंबिले असावे. आणखी असे की, स्वतः निर्मित केलेल्या संघटनेवर आपले आधिपत्य रहावे असे इंडोनेशियास वाटत असावे म्हणून चीनने नेतृत्व करण्याबद्दल नापसंतीही असणे शक्य आहे.

संयुक्तराष्ट्रांच्या संघटनेचा आकार काय असावा, असे चीनला वाटते, हे सोडले तरी पेकिंगच्या मनात आफ्रो-आशियाई राष्ट्रे जागतिक समाजापासून फुटून निघावी, आणि आर्थिक मदतीस अंतरावी, असे आहे. चिनी प्रतिनिधींनी संयुक्त राष्ट्रांच्या आफ्रिकी आर्थिक आयोगाच्या निरीक्षकास गेल्या फेब्रु-वारीत भरलेल्या आफ्रो-आशियाई आर्थिक परि-संवादातून हाकलण्याचा प्रयत्न केला हेच या उद्देशाचे एक उदाहरण मिळते. त्याप्रसंगी चिनी मंडळींनी असे स्पष्टीकरण केले की परिसंवादाचे संयुक्तराष्ट्रांच्या निरीक्षकास निमंत्रण देणे ही वाईट प्रथा आहे; आणि ते आफ्रो-आशियाई साम्राज्यशाहीविरोधी एकजुटीच्या उदात्त हेतूच्या विरुद्ध आहे.

जनरल ने विनने जुलैमध्ये पेकिंगला भेट दिली त्याप्रसंगी रंगून दैनिकाने अशा कृती व विधाने यांच्या संग्रहाचा आढावा घेऊन असा अर्थ काढला आहे :

" बर्मा संयुक्तराष्ट्रांना अजून पाठिंबा देत आहे; परंतु लाल चीनच्या संयुक्त राष्ट्रासंबंधाच्या धोरणात मोठा बदल घडून आला आहे. पूर्वी चीनला संयुक्त राष्ट्रांमध्ये प्रवेश इष्ट वाटत होता. आता तशी इच्छा राहिली नाहीसे दिसते. "

## लुडबूड नको

जरी पेकिंगच्या ताठर धोरणाचा जागतिक मतास धक्का बसला असला तरी हे खरे आहे की, चिनी नेत्यांचे वर्तन संयुक्तराष्ट्रांच्या चिंताविषया-संबंधीच्या त्यांच्या कल्पनांशी अगदी सुसंगत आहे. चिन्यांनी असे जाहीर केले आहे की, संयुक्तराष्ट्रांनी व्हिएटनामच्या पेचप्रसंगात लुडबुड करण्याचे कारण नाही. पेकिंगच्या मते तिबेटमधील चिनी दडपशाहीसंबंधी वृत्तनिवेदन करण्याचा सं. राष्ट्रांचा अधिकार नाही, कारण चीनचा तो अन्तर्गत व्यवहार आहे. व्हिएटनामच्या युद्धासंबंधी तोडगा काढण्याकरिता उ थांट पेकिंगला भेट देणार, असे वृत्त आले तेव्हा चीनने त्याला बजावले की, थांट भलता दरवाजा ठोठावत आहे, संयुक्त राष्ट्रांची ढवळाढवळ अस्थानी आहे, ती सहन केली जाणार नाही.

आणखी पंतप्रधान चौ-एन्-लायने असा खुलासा केला की, संयुक्त राष्ट्रांचा चीन सदस्य असता तरी व्हिएटनामबद्दलचा दृष्टिकोण त्याने बदलला नसता. असेही वृत्त आले होते की, फ्रेंच संस्कृतीमंत्री आन्द्र मार्लोने पेकिंगला भेट दिली तेव्हा चिन्यांनी असे सूचित केले की चीन सुरक्षा समितीचा सदस्य असता तर व्हिएटनामसंबंधी विचारविनिमयाची अधिक आशा करता आली असती. परंतु चौ ने ही वृत्ते बंद पाडली; त्याने असे जाहीर केले की, सं. राष्ट्रांमध्ये लाल चीनला सदस्यत्व देणे याचा व्हिएटनामचा प्रश्न सोडविण्याशी केव्हाही संबंध जोडता कामा नये; कोणत्याही परिस्थितीत चीन आपला मुद्दा सोडणार नाही. अनेक वर्षांपूर्वी चीनने आपली भावना स्पष्ट केली की, विचारविनिमय हा जास्तीतजास्त प्रासंगिक उपाय होय.

" कायमची विश्वशांतता केवळ विचारविनिमयाने साध्य होऊ शकेल, असा भ्रम आम्हास कधी नव्हता. "

सोविएट युनियनशी चाललेल्या वादंगात चिनी कम्युनिस्ट पक्षनेत्यांनी बजावून सांगितले की, पश्चिमी लोकशाह्यांशी प्रामाणिक सहकार्याचा मध्यममार्ग उपलब्ध आहे, अशावर आमचा मुळीच विश्वास नाही; आणि जर तसा आहे, असे कोणी सुचवीत असतील तर ते मार्क्सवादी-लेनिनवादी विशुद्धते-विरुद्ध पातक होय. माओच्या 'एक विभक्त होऊन दोन होतात,' परंतु 'दोन एक होत नाहीत' या ब्रीदाला घरगुती शासनातून आंतरराष्ट्रीय संबंधांच्या परिसरात आणून सोडले. शत्रूशी विचारविनिमय करण्यात चिन्यांनी भाग घेतला आहे, यात विरोध काही नाही. संसदीय पद्धती केवळ एक डावपेच म्हणून मान्य करणे शक्य आहे; मात्र ती मुळात इष्ट आहे असे मात्र मान्य होता कामा नये.

" शांततामय आणि सशस्त्र, उघड व गुप्त, वैध व अवैध हे सगळे संघर्षाचे प्रकार, संसदीय संघर्ष, जन-संघर्ष, इत्यादी कुशलतेने चालविता येत असतील तरच कामगारांचा बिनीचा वीर नेहमीच अजिंक्य राहील. संसदीय वा अन्य वैध प्रकारांचे संघर्ष चालविणे शक्य व आवश्यक असेल तर त्यास नाकारणे अयोग्य होय. परंतु मार्क्सवादी-लेलिनवादी पक्ष भांडवलशाहीने संमत केलेल्या मर्यादेत वैध वा संसदीय संघर्षास आडवून ठेऊन संसदीय व वैध वादास वाहून घेईल तर कामगारक्रांतीचा व कामगार हुकूमशाहीचा त्याग हाच त्याचा परिणाम होईल. "

## पहिला सामना

यावरून ही गोष्ट लक्षात येऊ शकते की, पेकिंगची मागील निवेदने अस्थिर स्वरूपाची दिसतात. एका बाजूने असे दिसते की, लाल चीनला सं. राष्ट्रांमध्ये स्थान पाहिजे आहे. कारण त्यामुळे सदस्य म्हणून मानाचे स्थान प्राप्त होते. आणि लहान सदस्य राष्ट्रांवर प्रभाव पाडण्याकरिता अनुकूलता प्राप्त होते. परंतु दुसऱ्या बाजूने असे दिसते की, सदस्यत्वाच्या अंगभूत असलेल्या जबाबदाऱ्या मात्र पत्करण्यास पेकिंग नाखूष आहे.

लाल चीनला १९४९ च्या आक्टोबरमध्ये सुस्थिरता प्राप्त झाल्यानंतर हा विरोध स्पष्ट झाला आणि त्याचवेळी फार्मोसातील चिनी गणराज्याला मिळालेल्या साधारण समितीच्या व सुरक्षा समितीच्या












सदस्यत्वावर आपला हक्क नमूद केला. १९४५ साली संयुक्त राष्ट्रांच्या संस्थापकांपैकी एक चिनी सरकार होते. आणि त्याला सुरक्षा समितीचे निरंतर सदस्यत्व प्राप्त झाले आहे. म्हणून असा प्रश्न उपस्थित झाला की, फार्मोसातील चिनी सरकाराला की लाल चीनला मूळचा सदस्य म्हणून पात्रता आहे. १९५० च्या जानेवारीत सुरक्षा समितीने या प्रतिनिधित्वाच्या गुंतागुंतीच्या प्रश्नाचा प्रथम विचार केला. तेव्हा रशियाने फार्मोसातील सरकारला उडवून लावण्याचा प्रयत्न केला म्हणून सोव्हिएट प्रतिनिधींनी विरोधार्थ सभात्याग केला.

उत्तरेकडून आलेल्या आक्रमणापासून दक्षिण कोरियाच्या रक्षणार्थ संयुक्त राष्ट्रांनी पाठविलेल्या सेनादलाशी लढण्याकरिता पेकिंग सरकारची सेना नंतर त्याच वर्षी तेथे गेली. कोरियामध्ये चीनने केलेल्या हस्तक्षेपाच्या वृत्तावर चर्चा करण्याकरिता संयुक्त राष्ट्रांमध्ये आपले प्रतिनिधी पाठविण्याकरिता लाल चीनला गेलेले आमंत्रण त्याने धुडकावून लावले. उलट लाल चीनने २८ नोव्हेंबर, १९५० च्या सुरक्षा समितीकडे वू सियुच्युनच्या नेतृत्वाखाली आपले प्रतिनिधी मंडळ तैवानवर अमेरिकेने आक्रमण केले असा आरोप करण्याकरिता पाठविले. वू ने केलेल्या तक्रारीमध्ये अशीही मागणी केली की, ओरिया आणि तैवान येथून सैन्य काढून घेऊन शांततामय निर्णयाला संधी द्यावी. परतु त्यानंतर संयुक्त राष्ट्रांनी तपास करून चीनच आक्रमक आहे असे दिसून आले असे म्हटले. लाल चीनने असेही जाहीर केले की, शस्त्रविरामाकरिता बोलणी चालणी सुरू व्हावी म्हणून संयुक्त राष्ट्रांनी तयार केलेल्या सद्भावनामंडळाशी आम्हास कर्तव्य नाही. १९५१ मध्ये चीनला लष्करी माघार घेण्याचा प्रसंग येईपर्यंत चर्चा करण्याकरिता जे गोडीगुलाबीचे प्रयत्न झाले त्यानाही त्याने धुडकावून लावले. अशा रीतीने कम्युनिस्ट चीन आणि संयुक्त राष्ट्रे यांच्यामध्ये झालेला पहिला सामना कडवा होता. त्याच परिणाम असा झाला की, चीनला प्रतिनिधित्व मिळण्याकरिता झालेली चर्चा १० वर्षेपर्यंत लांबत गेली.

ही साधारण समितीची लांबण १९६१ मध्ये संपली व हा प्रश्न महत्त्वाचा मानला गेला आणि दोन तृतीयांश बहुमताने सदस्यत्व मिळावे असे ठरले. १९६१, १९६२ आणि १९६३ या साली पेकिंगला साधे बहुमतही मिळाले नाही. १९६४ च्या १९ व्या अधिवेशनात अधिवेशनाची मुदत संपेपर्यंत या प्रश्नाला वेळच मिळाला नाही.

### पेकिंगने मागितलेली किंमत

पेकिंगच्या विरुद्ध पुष्कळ सदस्यांनी मते दिली याचे कारण संयुक्त राष्ट्रांच्या सनदेतील उद्दिष्ट शुद्ध राहावे असा त्यांचा हेतू होता. या सदस्यांना ही संघटना शक्यतोपर्यंत सर्वव्यापी व्हावी अशी इच्छा होतीच; परंतु त्याबरोबरच ते करतानाच उद्दिष्टे आणि तत्त्वे यांची किंमत द्यावी लागू नये अशीही इच्छा होती.

आंतरराष्ट्रीय शांती व सुरक्षितता अबाधित राहावी आणि त्याचप्रमाणे जे आंतरराष्ट्रीय संघर्ष व प्रसंग शांतता मिळविण्यास कारण होतील. त्यांचा निकाल किंवा त्यातील तडजोड न्यायाच्या व आंतरराष्ट्रीय कायद्याच्या तत्त्वाशी सुसंगत ठेवून शांततामय साधनांनी घडवून आणावी या बाबतीत संयुक्त राष्ट्रे प्रतिज्ञाबद्ध झालेली आहेत. त्यांच्या सदस्यांनाही अशी फर्माने दिली आहेत की, आंतरराष्ट्रीय संबंधांमध्ये ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की, कोणत्याही राजकीय स्वातंत्र्याच्या व प्रादेशिक अखंडत्वाच्या विरुद्ध उत्पन्न होणाऱ्या धोक्यापासून किंवा सशस्त्र प्रयत्नापासून त्यानी अलिप्त राहावे.

कोरियन युद्ध सोडले तरी इतरही अनेक प्रसंगी चीनने या तत्त्वांचा भंग केला असताना त्याबाबतीत संयुक्त राष्ट्रांनी आपली चिंता स्पष्टपणे व्यक्त केली आहे. १९५० मध्ये चिनी सेनेने तिबेट ताब्यात घेतल्यानंतर तेथील मूलभूत हक्क व मानवी स्वातंत्र्ये पेकिंगने दडपून टाकली याबद्दल संयुक्त राष्ट्रांनी अनेक वेळा चिंता ठरावाच्या रूपाने व्यक्त केली. चीनने १९६२ मध्ये भारतावर आक्रमण केले, १९६३ साली अॅटम बाँबच्या चाचणीबंदीच्या तहाचा पेकिंगने जोरात धिक्कार केला आणि १८ राष्ट्रांच्या निर्लष्करी करणाच्या चर्चेमध्ये भाग घेण्याचे नाकारले यामुळे तर ही संयुक्त राष्ट्रांची चिंता अधिक वाढली.

लाल चीनच्या विरुद्ध सदस्यांनी मते दिली याचे आणखी एक कारण असे की, लाल चीनला












घेतल्यास फार्मोसाच्या सव्वा कोटी जनतेची उपेक्षा केली जाईल हेही होय. लाल चीनला प्रतिनिधित्व दिल्यास फार्मोसा व मुख्य चीन अशी दोन चिनी राष्ट्रे मानण्यास लाल चीन तयार होणार नाही. पेकिंगचे धोरण ठरविणारे नेते फार्मोसा द्वीपावरील आपले नियंत्रण नाकारणारी कोणतीही सूचना मान्य करण्यास तयार नाहीत.

"दोन चीन मानावयास लावणारा कट म्हणजे कधीही खरे न होणारे स्वप्न होय. फार्मोसा हा चीनचा अविभाज्य असा भाग आहे. ते निराळे राज्य, तटस्थ राज्य, संयुक्त राष्ट्रांच्या विश्वस्ततेखालील राज्य निर्माण करण्याचा सर्व प्रयत्न किंवा संयुक्त राष्ट्रांच्या देखरेखीखाली फार्मोसा सार्वमत घेऊन स्वयंनिर्णयाचा हक्क देण्याचा प्रयत्न हे सर्व चीनचे दोन तुकडे पाडण्याचे बेकायदेशीर प्रयत्न होत."

फार्मोसाच्या बाबतीत चीनने केव्हाही नमते धोरण घेतले नाही आणि अवास्तव अटी संयुक्त राष्ट्रावर लादण्याचाही प्रयत्न केला. १९६१ साली चीनने वावदूकपणे असा आरोप केला की, अमेरिकेने फार्मोसा ताब्यात ठेवला आहे. म्हणून अशी मागणी केली की हा ताबा नष्ट व्हावयास पाहिजे :

"एकाच अटीवर आम्ही संयुक्त राष्ट्रांमध्ये उपस्थित होऊ शकतो. ती म्हणजे फार्मोसावरील अमेरिकेचा ताबा नष्ट व्हावयास पाहिजे आणि त्याबरोबर फार्मोसाच्या परिसरातील सातवे आरमारही परत नेले पाहिजे."

गेल्या डिसेंबरमध्ये चीनने आणखी एक अट घातली की, साधारण समितीत व सुरक्षा समितीतच नव्हे तर संयुक्त राष्ट्रांच्या सर्व उपसंस्थांमधूनही फार्मोसाची हकालपट्टी व्हावयास पाहिजे.

शेवटची अशी अट यावर्षी पेकिंगने घातली की, संयुक्त राष्ट्रांची पुनर्घटना व्हावी व झालेल्या चुका निस्तरण्यात चाऊ-एन्-लायने अगदी अलीकडे आणखी एक मागणी केली. कोरियन युद्धामध्ये कम्युनिस्ट चीन संयुक्त राष्ट्रांनी आक्रमक ठरविलेला या गोष्टी संबंधात तो म्हणतो की, चीनला आक्रमक ठरवून त्याची अपकीर्ती केली. संयुक्त राष्ट्रांनी ही गंभीर चूक केली आहे, ही पूर्ण सुधारली पाहिजे, आणि याउपर कसलीही तडजोड सहन केली जाणार नाही.

## नोंदलेल्या गोष्टी

असे म्हणतात की, चीन कोणत्याही आंतरराष्ट्रीय संघटनेतून वगळला गेला आहे. आणि राष्ट्रा-राष्ट्रांमधील तडजोडीच्या प्रयत्नांचा त्याला अनुभव नाही. परंतु वस्तुस्थिती अशी आहे की, वीसपेक्षा अधिक आंतरराष्ट्रीय संघटनांमध्ये चीनची भागीदारी आहे. विश्वशांतीमंडळापासून तो आंतरराष्ट्रीय टपाल-खात्यांच्या संघटनांपर्यंत त्याचा संबंध आहे. १९५४ साली इंडोचायनासंबंधी झालेल्या जिनेव्हा परिषदेत त्याने भाग घेतला. कोरियन युद्धाच्या अखेरीस शस्त्र-विरामाच्या चर्चेत आणि अमेरिकेच्या विरुद्ध प्रचार करीत राजदूतीय चर्चांमध्येही त्याने भाग घेतलेला आहे. पेकिंगच्या हालचालींच्या या नोंदीवरून चीन संयुक्त राष्ट्रांमध्ये कसे वर्तन करील याचे दिग्दर्शन मिळते. तेथे आल्यावर आपली दीक्षा देण्याचा त्याचा अट्टाहास सुटेल काय याचीही त्यावरून कल्पना येते.

एकंदर ही नोंदणी निराशेकडे नेते. मित्र आणि शत्रू या दोघांनाही चीन हा आपली उद्दिष्टे साधण्याकरिता एकचित्त कसा असतो याचा अनुभव आहे. उदा. दुसरी बांडुंग परिषद गेल्या जून १९६४ मध्ये अलजीर्स येथे भरावयाची ठरली होती, ती मुदतीवर ढकलण्याच्या पूर्वी मतभेदांचा बुजबुजाट झाला होता. खरे पाहता त्या परिषदेचा सर्वात प्रखर पुरस्कार करणारा चीन होय; तरीदेखील सोव्हिएट युनियनला बहिष्कार घालण्याचे ध्येय सिद्ध होणे शक्य असतानाही त्याचीही पर्वा चीनने केली नाही.

ज्या परिषदांमध्ये संयुक्त राष्ट्रांच्या इतर अनेक सदस्य देशांपेक्षा तत्त्वत: चीनच्या दृष्टीने मतभेदाची फार थोडी निमित्ते सापडतात त्याही परिषदा त्याने उधळून लावल्या आहेत. उदा० सोव्हिएट आलोचकाने चिनी प्रतिनिधींवर असा आरोप केला की, कामगार संघटनांच्या विश्वसंमेलनाच्या परिषदांमध्ये ते प्रतिनिधी फाटाफूट पाडण्याकरिता अत्यंत निंद्य अशी पद्धत वापरत असतात. या आरोपांमध्ये असे म्हटले आहे की, चिनी कामगार संघटनांचे प्रतिनिधी जागतिक संघर्ष पेटविण्याचा प्रयत्न करतात; त्याच प्रमाणे सोव्हिएट युनियनच्या किंवा अन्य समाजवादी देशांच्या प्रतिनिधींच्या विषयी नव्या स्वतंत्र झालेल्या राष्ट्रांच्या प्रतिनिधींच्या मनामध्ये गैरसमज पसर-

विण्याचा प्रयत्न करतात. इतकेच नव्हे तर त्या परिषदा एक तर मोडाव्या तरी नाहीतर संयुक्त निर्णय घेणे अशक्य तरी करावे, अशा तऱ्हेचा ते डाव खेळत असतात. हे सोव्हिएट आलोचकांचे म्हणणे ध्यानात घेण्यासारखे आहे.

१९६३ साली मास्को येथे भरलेली महिला विश्व-परिषद चिन्यांच्या आरडाओरडीने मोडली. १९६३ व १९६४ साली भरलेल्या अॅटम बाँब व हैड्रोजन बाँब परिषदा सोव्हिएट व चिनी प्रतिनिधींच्या वाचाबाचीने खतम झाल्या. १९६३ मध्ये वृत्तपत्रकारांच्या तिसऱ्या विश्व-संमेलनाला आम्ही आमचे प्रतिनिधी पाठविणार नाही असे चिनी वृत्तसंस्थेने जाहीर केले. याचे असे कारण की, त्या संमेलनात साम्राज्यशाहीच्या आणि नव्या जुन्या वसाहतवादाच्या विरुद्ध चालवावयाच्या विग्रहाचे राजकीय प्रयत्न चर्चावयाचे नाहीत, केवळ त्या धंद्यासंबंधाचेच प्रश्न चर्चावयाचे अशी योजना चिनी वृत्तसंस्थेला अमान्य होती. वास्तविकपणे मूलत: अशा संघटना अराजकारणी असतात. अशाही संघटनांमध्ये पेकिंगच्या राजकारणाला आपले आधिपत्य गाजवावेसे वाटते. हीच गोष्ट लाल चीन निश्चितपणे युनेस्कोसारख्या उपसंस्थांसहित संयुक्त राष्ट्रांच्या सर्व संघटनेला लावण्यास भाग पाडील.

आंतरराष्ट्रीय रेडक्रॉसवरही पेकिंगने असा आरोप केला की, ती संघटना चीनच्या अंतर्गत कारभारामध्ये ढवळाढवळ करून अमेरिकेचे सत्तात्मक राजकारणास मदत करीत आहे. कारण रेडक्रॉसने विसाव्या आंतर-राष्ट्रीय परिषदेकरिता फार्मोसालाही आमंत्रण दिले आहे. ते आमंत्रण रद्द केल्याशिवाय आम्ही भाग घेऊ शकत नाही असे पेकिंगने सांगितले. याच भावनेने जीव-रसायनशास्त्राच्या संघातून गेल्या मार्चमध्ये पेकिंगने अंग काढून घेतले. कारण त्या संघाने तैपे येथील या विषयाच्या विद्यापीठाला प्रवेश दिला.

संयुक्त राष्ट्रांमध्ये प्रवेश मिळविण्याकरिता पेकिंग अनेक अडवणुकीचे मार्गही अनुसरते. या संबंधात पेकिंगचे तत्त्व असे आहे की, शांततामय उपाय दौर्बल्याचे एक चिन्ह होय, धाकदपडशाच्या योगाने मिळतेजुळते करण्याचा प्रयत्न होणे संभवते. असाहि युक्तिवाद केला गेला आहे की, ताठरपणाच्या योगाने चीन हे सामर्थ्यशाली राष्ट्र आहे असे मानावे लागते. आणि संयुक्त राष्ट्रांना चीनवाचून काहीही महत्त्वाचे कार्यसाफल्य प्राप्त होणार नाही, असे चीन म्हणत असतो. हा युक्तिवाद एक गोष्ट लक्षात घेत नाही की, संयुक्त राष्ट्रांचा सदस्य म्हणून चीन ती संघटनाच मोडकळीस आणील. संयुक्त राष्ट्रांनी आतापर्यंत अनेक महत्त्वाची यशे संपादित केली आहेत. त्यांच्याकडे पेकिंग दुर्लक्ष करते. दुसऱ्या विश्वयुद्धानंतर इराणमधून सोव्हिएटने इराक आणि तुर्कस्तानकडे आक्रमण करावयाचा प्रयत्न केला तो थांबविण्यात आला; अरब आणि इझरायल यांच्यामध्ये शस्त्र-विराम घडवून आणला; सायप्रसमधील रक्तपात थांबविला; आणि डच राज्यकर्ते व इंडोनेशिया यांच्यामध्ये युद्धविराम घडवून आणला, त्यामुळे इंडोनेशियाला स्वातंत्र्य मिळाले. संयुक्त राष्ट्रांची आणीबाणीची सेना विश्वशांतीच्या स्थापनेकरिता निर्माण झाली असून ती कोणत्याही एका सत्तेच्या ताब्यात नसलेली जगातील पहिली सशस्त्र संघटना आहे. इतकीच महत्त्वाची दुसरी गोष्ट म्हणजे सहस्रावधी डॉक्टर, इंजिनिअर, कृषिविशारद, मध्यस्थ आणि निरीक्षक संयुक्त राष्ट्रांच्यातर्फेच विश्वाची सेवा करीत आहेत. बहुतेक राष्ट्रांना याची जाणीव आहे की, सं. राष्ट्रांमध्ये आपल्या तक्रारींना वाचा फोडता येते आणि संभवनीय तीव्र संघर्ष थंडही करता येतात. एवढी कमीत कमी गोष्ट संयुक्त राष्ट्रांतर्फे साधता येते. विनाशाची शक्तिशाली शस्त्रास्त्रे असलेल्या या जगात मिळणारी अल्पशी उसंतही एक विचार्य यश होय.

संयुक्त राष्ट्रे जगातील देशांना अशी खात्री पटवीत आहेत की, धाकदपडशा आता उपयोगी पडेनासा झाला आहे आणि जबरदस्तीचा मार्ग अव्यवहार्य मानला पाहिजे. परंतु अजून चीनची तशी खात्री झालेली नाही. त्या संघटनेच्या सिद्धान्ताच्या निश्चिततेला चीन आव्हान देत आहे. जर संयुक्त राष्ट्रे चीनच्या मागणी-पुढे वाकली तर अध्यक्ष माओ-त्से-तुंग असे मानील काय की ही संघटना स्वत:च्या दृष्टीने क्रांतिकारक बनत आहे? आणखी मुद्याची गोष्ट अशी की, जर कम्युनिस्ट चीन सदस्य झाला तर क्रांतीला सुरवात होऊन त्या क्रांतीमुळे तिची जुनी रचना नष्ट होईल काय? या राखेतून विश्वशांतीचा उदय होऊ शकेल काय?

— "करंट सीन्" हाँगकाँग १७ सप्टेंबर १९६५








अनुक्रमणिका








अनुक्रमणिका






